# करुया आरोग्य संवाद!

प्रशांत खुंटे

S A T H I
Support for Advocacy & Training to Health Initiatives
(Action Centre of Anusandhan Trust)

**प्रकाशक :**
'साथी' (SATHI - **S**upport for **A**dvocacy & **T**raining to **H**ealth **I**nitiatives)
Action Centre of Anusandhan Trust
फ्लॅट नं. ३/४, अमन (ई) टेरेस सोसायटी,
डहाणूकर कॉलनी, कोथरुड,
पुणे - ४११ ०२९
फोन : (०२०) २५४५१४१३ / २५४५२३२५
फॅक्स : (०२०) २५४५१४१३
E-mail : cehatpun@vsnl.com

**पहिली आवृत्ती** : जुलै २००४
**सुधारित आवृत्ती** : २ ऑक्टोबर २००५, महात्मा गांधी जयंती

**मांडणी व सजावट** : शारदा महल्ले, शैलेश डिखळे, **मुखपृष्ठ व रेखाचित्रे** : चंद्रशेखर जोशी



**मुद्रक :** एन. आर. एन्टरप्राईझेस, पुणे

**देणगी मूल्य** : २०/- रुपये

(या पुस्तिकेचे लिखान करताना सेहत साथीने प्रकाशित केलेल्या साहित्याचा तसेच इतर सरकारी माहिती पत्रांचा वापर करण्यात आला आहे. पुस्तिकेच्या लिखाणात डॉ. अनंत फडके व 'साथी'च्या इतर सहकाऱ्यांचे बहुमोल योगदान आहे.)

# आरोग्य सत्याग्रहाकडे नेणारा आरोग्य संवाद

दक्षिण अफ्रिकेतील वर्णद्वेषाविरोधात महात्मा गांधींनी लढा पुकारला. कातडीच्या रंगानूसार मिळणाऱ्या (अ)न्यायाविरोधातील ती चळवळ होती. कायदे करणारे गोरे, राबवणारेही गोरेच. हक्कांची भाषा करणार कशी? हक्क मागायचे कसे? परंतु गांधींजींनी लढ्याचं एक विशिष्ट तंत्र विकसित केलं. ते तंत्र म्हणजे सत्याग्रह! पुढे हे तंत्र भारतीय स्वातंत्र्यलढ्याचं महत्वाचं हत्यार ठरलं. सामाजिक हक्क मिळवण्याच्या चळवळीत डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनीही हे तंत्र चवदार तळ्याचा-काळाराम मंदिराचा सत्याग्रह असं वेळोवेळी अवलंबलं.

सत्याग्रहाचं वैशिष्ट्य काय तर आपला मुद्दा बरोबर व न्याय्य असल्याची सत्याग्रहींना असणारी बालंबाल खात्री व या न्यायावरील विश्वासा आधारेच प्रतिपक्षाच्या नैतिकतेला आव्हान देणे. ही व्यक्तीने किंवा समूहाने सत्यासाठी केलेली अहिंसक कृती असायची. त्यात प्रसंगी आत्मक्लेश सहन करणे होते. हे आत्मक्लेश वैयक्तिक स्वार्थासाठी नसून आपल्या न्याय्य मागणीसाठी आहेत या भूमिकेने प्रतिपक्षाची कोंडी करणे होते. प्रतिपक्षाच्या दृष्टिकोनात, धोरणात किंवा भूमिकेत आपल्याला जाणवलेल्या सत्याच्या प्रकाशात योग्य ते परिवर्तन घडवून आणणे हे सत्याग्रहाचे उद्दिष्ट. या तंत्रानं ब्रिटिशांच्या नाकी नऊ आणले. भारत स्वतंत्र झाला.

पण आज पुन्हा सत्याग्रहाची गरज आहे. आपणच निवडलेल्या सरकारा विरोधात. कारण आपण निवडून दिलेल्या जनप्रतिनिधींपैकी शंभरावर संसद सदस्य कोट्याधिश आहेत आणि हा देश बहुसंख्य गरिबांचा आहे. (ते प्रतिनिधी केवळ श्रीमंत आहेत म्हणून नव्हे तर ते स्वतःच्याच फायद्याची धोरणं राबवायला संसदेत बसलेत म्हणून!) संपत्ती, रोजगार, विकास शहरांत एकवटलाय आणि हा देश बहुसंख्य खेड्यांचा आहे. शहरांचा दुस्वास म्हणून नव्हे तर सर्वांचा विकास शक्य होता, आहे हे सांगण्यासाठी हवा सत्याग्रह!

हेच पहाना! गरिबांच्या पोरांना स्वस्तात शिकता यावं म्हणून गरिबांनी निवडून दिलेलं सरकार अनुदान देऊन कॉलेजेस चालवतं. आणि इथं गरीब मुलं धड प्राथमिक शिक्षणही पूर्ण करू शकत नाहीत. अनुदानित उच्च शिक्षण घेणाऱ्यांची मात्र चांदी. असे अनेक उच्चशिक्षित डॉक्टर्स मायभूमीला रुग्णशय्येवर सोडून परदेश सेवेला जातात. उरतात ते शहरात पॉश क्लिनिक थाटतात. अशा डॉक्टरांच्या आपलं ज्ञान बाजारात उभं करण्याच्या दृष्टिकोनाला आव्हान देण्यासाठी सत्याग्रहाची गरज आहे.

कुपोषणाच्या, भूकबळींच्या सिझनल बातम्या वर्तमानपत्रं नेमानं छापतात. मग किस पडतो चर्चेचा! म्हणे भूकबळी नव्हतेच ते! कारण म्हणे त्यांच्या घरात सापडले होते दाणे! ते दाणे येत्या सालच्या पिकासाठी ठेवले होते हे सांगण्यासाठी सत्याग्रहाची गरज आहे. ते पिक घ्यायचं होतं कारण इथल्या प्रत्येकाचं उत्पादन या देशाचं उत्पादन आहे. देशासाठी उत्पादन करणाऱ्यांना सरकारी दवाखान्यात औषधोपचार मिळू नये?

आजारांना रोखण्यासाठी उभारलेली यंत्रणा कुजत जावी आणि रुग्ण 'हेल्थ इंडस्ट्रीचा' गिऱ्हाईक व्हावा? हे उघड्या डोळ्यानं पाहायला लागू नये म्हणून सत्याग्रहाची गरज आहे.

आपलं सरकार महसुलातून आरोग्यासाठी खर्च करतं म्हणजे काय? तर वैद्यकीय शिक्षण, व्यवस्थापन आणि आरोग्य सुविधांची निर्मिती यांवर भरपूर रक्कम सामाजिक खर्च या नावाने 'खर्च' होते. त्यातून काय होतं? वैद्यकीय शिक्षण घेणाऱ्यांबद्दल आधीच सांगितलं. व्यवस्थापन म्हणजे आरोग्य खाते म्हणून जे काही आहे ते 'आहे तसं' चालवत ठेवण्याचा पगारी खर्च वगैरे. आणि सुविधांची निर्मिती म्हणजे इमारती उभारायच्या. यामुळं बहुधा कॉन्ट्रॅक्टरांचं आरोग्य सुधारत असावं. कारण त्या इमारतींमधून काही सेवा दिल्या तरी जातात की नाही, डॉक्टर सरकारीच दवाखाना चालवतात की खासगी, दवाखान्यात स्वच्छता असते की नाही? याची बहुधा कुणी फिकीर करत नाही. या बथ्थडपणाच्या विरोधात सत्याग्रहाची गरज आहे.

आपण भारतीय नागरिक आहोत. आम्ही भारताला एक सार्वभौम समाजवादी धर्मनिरपेक्ष लोकशाही गणराज्य घडवण्याचा निर्धार केला आहे. न्याय, समानता, स्वातंत्र्य व बंधुता ही आमची उद्दिष्टं आहेत. ती गाठण्यासाठी प्रत्येकाला सन्मानाने जगता यायला हवं. मात्र सन्मानानं जगायचं तर धडधाकट राहायला हवं. सध्या मात्र धडधाकट आहेत ते हेल्थ इंडस्ट्रीवाले, औषध कंपन्यावाले, सुईच्या नावानं पाणी टोचणारे आणि असे बरेच. अशी फसवेगिरी करून आरोग्य-हक्काची पायमल्ली करणाऱ्यांच्या विरोधात आरोग्य सत्याग्रहाची गरज आहे.

प्रत्येक भारतीय नागरिकाला सन्मानाने जगण्याचा हक्क आहे. त्यासाठी आवश्यक औषधोपचार सेवा मोफत, सहज व सर्वत्र उपलब्ध व्हायला हव्यात. कारण जे घाम गाळून देश घडवतात त्यांचा सन्मान राखायलाच हवा. ही आपली आरोग्य सत्याग्रहाची न्याय्य मागणी. हे आपल्याला जाणवलेलं खरं मूल्य किंवा एक छोटं सत्य. त्याच्या प्रकाशात आरोग्य संवाद हे तंत्र आरोग्य सत्याग्रहाला वाचा देण्याचं एक माध्यम आहे.

आरोग्य संवादामधून जनतेला आपले आरोग्य हक्क काय आहेत याची जाणीव करुन देता येईल. आरोग्य सेवा देण्यासाठी नेमलेल्यांना आपली नेमणूक सरकार दरबारी नसून जनसेवेसाठी आहे याचं भान मिळेल. जे खासगी डॉक्टर गल्ला भरायला बसलेत त्यांना जनतेत झालेल्या जागृतीमुळे आपल्या सेवाधारित व्यवसायाची नीतिमूल्ये आठवतील. असरकारी नाही ते सरकारी असं आपलं आपणच ठरवून खासगीकरणाची माळ जपणाऱ्यांना, सार्वजनिक सेवेला निकालात काढणाऱ्यांना, लोकांनी आरोग्य संवादातुन आरोग्य सेवांची जोरकस मागणी केल्यास जाग येईल. त्यांना असं जागं करणं म्हणजेच त्यांच्या नैतिकतेला आव्हाण देणं. आपली मागणी न्याय्य आहे ती आपल्या देशहिताची आहे या आग्रहानं सरकारी धोरणात, सध्याच्या दृष्टिकोणात फरक घडवून आणणारा आरोग्य सत्याग्रह आपल्याला हवा आहे. त्याकडे आरोग्य संवाद नेऊ शकेल.

या पुस्तिकेत सरकारी आरोग्य यंत्रणेशी आरोग्य संवाद, गावकऱ्यांमध्ये आपसात आरोग्य संवाद,

खासगी डॉक्टरासोंबत इंजेक्शन-सलाईनचा आरोग्य संवाद, आरोग्य सेवा का नाकारल्या याचा जाब विचारण्यासाठी जन सुनवाई अशा माध्यमांची माहिती दिली आहे. ही माध्यमे उपयोगात आणण्यासाठी पूरक माहितीही जागोजागी दिली आहे. आरोग्य सत्याग्रहाला तोंड फोडतील, वाचा देतील अशा घटना या आरोग्य संवादातून समाजात घडतील अशी आम्हाला खात्री आहे. तर या करुया आरोग्य संवाद!

या पुस्तिकेत आपण आरोग्य संवादाची माहिती घेणार आहोत. कशासाठी? हे जाणण्यासाठी पुढील छोटी गोष्ट-

## कसे विचित्र शहर आहे हे!

एका शहरामध्ये खेड्यातला एक माणूस गेला. मुलाच्या आणि स्वतःच्या एस्. टी. च्या तिकिटापुरतेच पैसे जवळ, परतीच्या तिकीटापुरते म्हणाना. शहरात मुलगा आजारी पडला, म्हणून हा डॉक्टरकडे गेला. म्हणाला, 'डॉक्टरसाहेब मुलगा एकाएकी आजारी पडला हो,' डॉक्टरांनी तपासले. म्हणाले, 'इंजेक्शन द्यायला हवे.'

'ठीक आहे.' हा म्हणाला. 'द्या इंजेक्शन.'

'वीस रुपये पडतील.'

'मी पैसे घेऊन आलो नाही. परक्या ठिकाणी आलो आहे.'

डॉक्टर म्हणाले, 'मी दिले असते इंजेक्शन, पण मी देखील ते विकत आणलेले आहे.'

'मग ह्या गावात आणखी कुणाजवळ इंजेक्शन नाही?'

'आहे.'

डॉक्टरने एका श्रीमंताचे व एका दुकानदाराचे नाव सांगितले. तो इसम दुकानदाराकडे गेला. दुकानदार म्हणाला 'हे दुकान आहे. दुकानात जिन्नस असतात; पण ते 'विकायला' असतात, 'द्यायला' नसतात.'

मग हा श्रीमंताकडे गेला. म्हणाला, 'लोक म्हणतात तुमच्याकडे इंजेक्शन आहे.'

'आहे.' तो म्हणाला.

'माझा मुलगा आजारी आहे, देता का?'

'नाही,' श्रीमंत म्हणाला, 'मी विकत आणले आहे, मी पैसे खर्च केले आहेत, तुला कसे देऊ?'

'तुमच्या घरी कुणी आजारी आहे का?'

'नाही आमच्या घरी कुणी आजारी नाही.'

कसे विचित्र शहर आहे हे? ज्याला आजार आहे त्याला औषध नाही. आणि जिथे आजार नाही तिथे औषध आहे.

असेच विचित्र आजचे जग आहे. जिथे भूक आहे तिथे अन्न नाही आणि जिथे अन्नाचे ढीग आहेत, तिथे भूक लागायला औषध घ्यावे लागते. जो थंडीने काकडतो त्याला वस्त्र नाही आणि ज्यांच्याजवळ कपडे आहेत, त्यांना कुठला कपडा केव्हा घालावा ह्याची संधी शोधावी लागते.

*(क्रांतिवादी तरुणांनो !- ले.- दादा धर्माधिकारी)*

## प्रत्येकाची आरोग्याची न्याय्य गरज भागायला हवी!

ज्यांच्याजवळ पैसा आहे त्यांनाच औषधोपचार मिळतील हा सध्याच्या जगाचा नियम बनत आहे. तो मोडायला हवा. आपल्याला असं जग हवंय जिथे कुणी भुकेला राहता कामा नये, प्रत्येक गरजवंताला वस्तु मिळाली पाहिजे, जिथे आवश्यकता असेल तिथे वस्तू असावी. जे थंडीत काकडतात त्यांना वस्त्र मिळावीत. आजाऱ्यांना औषधे मिळायला हवीत. या गरजा भागण्यासाठी कसल्याही दुसऱ्या योग्यतांची गरज नाही, कुठलीही अट नाही. असे जग निर्माण करण्यासाठी आपल्यात उत्कंठा आहे ना? झालं तर मग. या पुस्तिकेत आपण आरोग्य संवादाबद्दल चर्चा करणार आहोत. हा आरोग्य संवाद प्रत्येक गरजवंताला त्यांच्या अर्थिक, सामाजिक दर्जाचा विचार न करता आरोग्य सेवा मिळाव्यात यासाठी करायच्या प्रयत्नांचे एक साधन आहे.

## आरोग्य सेवांचा विचार कशासाठी?

माणसाच्या वेगवेगळ्या मूलभूत गरजा आहेत. या ठिकाणी आपण केवळ आरोग्य सेवांचा विचार करणार आहोत. सरकारी आरोग्य सेवा दिवसेंदिवस कमकुवत होत आहेत. त्यामुळे अनेकांना खासगी आरोग्य सेवांवर अवलंबून रहावे लागते. परंतु खासगी डॉक्टरांची फी सर्वांना परवडत नाही. ग्रामीण-आदिवासी भागात केवळ आजारपणांवरचा खर्च करण्यात कर्जबाजारी झालेल्यांचं प्रमाण प्रचंड आहे. काही बोगस डॉक्टर्स गावागावात फिरुन उपचार देतात, परंतु शास्त्रीय ज्ञानाधारित उपचारांऐवजी थातुरमातुर उपचार करुन रुग्णांना नाडणाऱ्यांचे प्रमाणच त्यांच्यात जास्त आहे. थोडक्यात सांगायचे तर, खासगी सेवा या महागड्या तर आहेतच शिवाय गरीब रुग्णांची फसवणूकही तेथे होऊ शकते.

अशा वेळी प्रमाणित, सोयीचे व किफातशीर उपचार मिळण्याचे एकमेव ठिकाण म्हणजे सरकारी दवाखाने. सर्व खेडोपाड्यात-वाड्यावस्त्यांवर आरोग्य सेवा व रुग्णांना उपचार मिळावेत यासाठी शासन मोठीच्या-मोठी यंत्रणा उभारते. ती उभारण्यामागे प्रत्येक गरजवंताला आरोग्य सेवा मिळाव्यात हाच हेतू आहे. 'सन २००० पर्यंत - सर्वांना आरोग्य' हे ध्येय गाठण्यासाठी महाराष्ट्र सरकारने राज्यात ९,६२५ उपकेंद्र व १,८०६ प्राथमिक आरोग्य केंद्रांचे जाळे निर्माण केले आहे. शिवाय फिरती आरोग्य पथके, ग्रामीण

रुग्णालयांचीही उभारणी करण्यात आली. पण प्रत्यक्ष परिस्थिती काय आहे?

रूग्ण सरकारी दवाखान्यात गेल्यास तेथे कधी डॉक्टर नसतात तर कधी औषधे. काही वेळा सरकारी डॉक्टरच स्वतःचा खासगी दवाखाना चालवतात. काही वेळा औषधे मेडिकल स्टोअर मधून विकत आणायला सांगतात. सरकारी दवाखान्याच्या परिसरात अस्वच्छता आढळते. इमारती नादुरुस्त आढळतात. काही ठिकाणी तर कर्मचाऱ्यांच्या निवासाचीही आबाळ आढळते. या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी आरोग्य सेवा यंत्रणेला सावरण्याची गरज आहे.

सरकारी दवाखान्यांची हीच प्रतिमा कायम झाल्याने लोकांनाही आता ही सेवा आपलीशी वाटत नसल्याचे दिसते. गावातले लसीकरण, शाळेतली आरोग्य तपासणी ही लोकांना आपली गरज वाटत नाही. ती केवळ आरोग्य कर्मचाऱ्यांची कामे समजली जातात. हळुहळु कर्मचाऱ्यांचाही उत्साह मावळतो. आरोग्य संवाद हे ही उदासिनता झटकण्याचे साधन ठरावे.

## मूलभूत हक्काला हरताळ

भारतीय संविधानात निर्देशक तत्वांमध्ये (भाग ४, अनुच्छेद ४७) नागरिकांचे पोषणमान, राहणीमान उंचावणे व सार्वजनिक आरोग्य सेवा सुधारणे हे राज्याचे प्राथमिक कर्तव्य नमूद केले आहे. परंतू आरोग्य सेवांची परिस्थिती दिवसेंदिवस खालावतच आहे. आरोग्य सेवांचे हे आजारपण म्हणजे नागरिकांच्या मूलभूत जगण्याच्या अधिकारावर आलेली गदा आहे.

सध्या खासगीकरणाच्या धोरणाची चलती आहे. त्यामुळे बहुतेक सरकारी उद्योगांमध्ये नोकरकपात केली जात आहे. आरोग्य कर्मचाऱ्यांचीही नोकरभरती थांबवल्याने संख्येने मर्यादित असलेल्या कर्मचाऱ्यांकडून दुप्पट क्षमतेच्या कामाची अपेक्षा केली जाते. सर्वंकष रोगप्रतिबंधक कार्यक्रमांऐवजी एखाद्याच आरोग्य कार्यक्रमावर भर दिला जातो. जी यंत्रणा खेडोपाड्यात पसरलेल्या आपल्या जाळयामार्फत प्रमुख आजारांवर उपचार, साथीच्या आजारांवर नियंत्रण, प्रतिबंध, माहिती-ज्ञान प्रसार ही कामे कुशलतेने करु शकते त्या यंत्रणेला ठराविकच कार्यक्रमांमागे लावले जाते. उदा- कुटुंबनियोजनाची टारगेट-संख्या ठरवून त्यामागे कर्मचारी दौडवले जातात. यामुळे दवाखान्यात २४ तास अँम्ब्युलन्स, त्यासाठी ड्रायव्हर उपलब्ध असावा यासारखे मूलभूत प्रश्न बिनमहत्वाचे ठरतात. यामुळे सरकारी आरोग्य सेवा कुचकामी आहे असे वाटून लोक नाईलाजाने खासगी दवाखान्यात जातात. ज्यांना हे परवडत नाही त्यांना मात्र वाऱ्यावर सोडणारे हे धोरण आहे. भारतीय संविधानातुन आपल्याला जो सन्मानाने जगण्याच्या हक्क मिळाला आहे त्याला अशा प्रकारे हरताळ फासला जात आहे. आपल्या मूलभूत हक्कांच्या संरक्षणासाठी या सार्वजनिक आरोग्य सेवा बळकट व्हायला हव्यात. म्हणून आरोग्य संवाद हवा.

## आरोग्य संवादच का?

कल्पना करा की, तो जो आजारी मुलाचा बाप होता तो चांगला पैलवान असता, आणि जरब दाखवून त्या श्रीमंताला किंवा दुकानदाराला तो म्हणाला असता, 'बच्चंजी, हें इंजेक्शन बऱ्या बोलाने दिलेस तर बरे आहे, नाही तर लक्षात ठेव माझ्या हातात दंडुका आहे.' परिणाम काय झाला असता? ज्याच्याजवळ दंडुका असेल त्याला वस्तु मिळेल. ज्याला गरज आहे त्याला मिळणार नाही.

आरोग्य सेवांचेही असेच आहे. ज्यांच्या मनगटात व खिशात जोर आहे त्यांना आरोग्य सेवा मिळतात. एखादा रूग्ण दगावल्यास नातेवाईकांनी डॉक्टरांना बदडल्याचे आपण वाचतो. असं काही घडल्यावर डॉक्टरही संपावर जातात. या दांडगाईचा परिणाम म्हणून सामान्य रुग्ण मात्र आरोग्य सेवांना मुकतात. त्या विशिष्ट दांडगाई करणारांना यापुढे कदाचित चांगली सेवा मिळुही शकते. मात्र ज्यांना काही आवाजच नाही अशा थरात अन्नाविना, औषधपाण्याविना कुणी मेलं तरी त्यांची कुणी दखलही घेणार नाहीत. त्यांना संघटित कृती शिवाय पर्याय नाही. ही कृती अशी असावी की जिचा परिणाम जास्त काळ टिकेल. आरोग्य संवाद ही अशीच संघटित कृती आहे. ज्यामध्ये पैशाचा किंवा दंडुक्याचा वापर नसून जनतेच्या (एकापेक्षा जास्त कितीही !अगदी दोघांच्याही) समूह शक्तीतून चांगली आरोग्य सेवा मिळवणे शक्य आहे. त्यासाठी दोन व्यक्तींमध्ये, संपूर्ण गावात, डॉक्टर-रुग्णात, आरोग्य सेवा देणारे व घेणाऱ्यात संवाद व्हायला हवा. तो सामंजस्याने व समान पातळीवर व्हायला हवा.

## आरोग्याची समस्या बहुपेडी आहे

आरोग्याची समस्या आहे म्हणून एकाच कुणाला दोष देता येत नाही. आणि केवळ दोषी ठरवून समस्याही सुटत नाही. बालमृत्यू रोखण्यासाठी गावागावात आरोग्य सेवा, औषधोपचार पोचले तरी ती समस्या पूर्णपणे सुटेलच असं नाही. तर एकूणच दारिद्र्य, बेरोजगारी, महिलांच्या आरोग्याची होणारी हेळसांड, बालविवाह, अंधश्रद्धा असे अनेक पदर प्रत्येक आरोग्य समस्येला आहेत. म्हणून जनतेमध्ये जागृती घडवण्यासाठी गाणी-नाटुकल्यांचा वापर करण्यापासून ते आरोग्य वर्धक शेतीचा प्रसार व शहरात बकालपणा वाढवणारे रोगट औद्योगिकीकरण रोखणे तसेच सरकारचे आरोग्य सेवांवरील बजेट वाढवण्यापर्यंत बहुपदरी उपाय राबवणे आवश्यक आहे.

या ठिकाणी या बहुपदरी समस्ये वरील उपाययोजनांना तोंड फोडण्याचे साधन म्हणून आरोग्य संवादाचा विचार आपण करणार आहोत. आता आरोग्य संवाद म्हणजे नक्की काय ते जाणून घेऊ.

# आरोग्य संवाद म्हणजे नक्की काय?

रेशनमध्ये भेसळ असली तर तुम्ही दुकानदाराला जाब विचारू शकता. एस. टी. च्या कंडक्टरने अरेरावी केल्यास आपणही अरेला कारे उत्तर देतो. कधीकधी मत मागायला आलेल्या पुढाऱ्यालाही, 'पाच वर्षे काय केलं?' असा खडा सवाल विचारण्याची आपल्यात हिंमत आहे. पण आपल्याला मिळणाऱ्या आरोग्य सेवांची हेळसांड होत असल्यास आपण नागरिक या नात्याने काय करतो? काही नाही! दवाखान्यात आपला आवाज कमजोर पडतो. कारण आपण दवाखान्यात जातो तेच मुळी आजारी, हतबल अवस्थेत. त्यामुळे रुग्ण म्हणून आपले हक्क-सन्मान यापेक्षा उपचार महत्वाचे. डॉक्टरकीचा, वैद्यकीय ज्ञानाचा, आरोग्य सेवा देणाऱ्या यंत्रणेचा (खास सरकारी बाणा व तज्ञपणाच्या भाईगिरीचा) एक दराराही असतोच. या दबदब्यात आपण दबून जातो. त्यामुळे खासगी डॉक्टरांनी अमुक इतकीच फी का घेतली, कशासाठी कोणते औषध दिले हे विचारण्याची आपल्याला छाती होत नाही. सरकारी दवाखान्यातच डॉक्टरांनी खासगी प्रॅक्टीस केली तरी खपून जातं. दवाखान्यात औषधे मिळाली नाही तर खासगीतून विकत घेतो, गावात आरोग्य सेवा द्यायला सरकारी कर्मचारी आले नाही तरी आपण फारसं मनावर घेत नाही. हे झालं आरोग्य सेवांबद्दलच्या उदासिनतेचं वर्णन, परंतु एखाद्यानं मनावर घेऊन आपल्या गावातील आरोग्य समस्येबद्दल काही हालचाल केलीच तर काय अनुभव येतो ते पुढील घटनेतून समजेल.

**आरोग्य समस्यांबद्दलची उदासिनता झटकुन नागरिकांनी आपसात तसेच आरोग्य सेवा देणारे डॉक्टर्स, वैद्यकीय कर्मचारी, खासगी डॉक्टर्स, त्यांच्या संघटना यांच्याशी चांगल्या आरोग्य सेवासांठी संघटितपणे संवाद करणे म्हणजे आरोग्य संवाद.**

## दादू ची धडपड .....

गावातील उलटी जुलाबाच्या साथीवर नियंत्रणासाठी दादू या इसमाने केलेल्या धडपडीची ही हकीकत.

शेजारच्या घरातील पोराला सकाळपासून जुलाब-उलट्या होत होत्या. दादू गावातला पुढारी गडी. त्याला राहवेना. दादूच्या दुर्गम आदिवासी पाड्यात शासनाने खास पाऊसकाळ म्हणून आरोग्य पथक व डॉक्टरची नेमणूक केली आहे. हे दादूला माहीत होते. पोराला घेऊन दादू डॉक्टरकडे आला. डॉक्टर नव्हते. दार बंद. मात्र डॉक्टरच्या दारात जुलाब-उलटी होणारे आणखी चार-पाच आजारी ताटकळत बसले होते. गावात पटकी ची साथ आल्याचे दादूने ओळखले.

तातडीने काय करायचे माहीत नव्हते. दादूने सरळ तालुका गाठला. तोपर्यंत दुपार झाली होती. साथीची वर्दी देण्यासाठी बीडीओंची भेट घेतली, तर त्यांनी 'लंच टाईम' संपल्यावर यायला सांगितले. दादू तहसीलदार कार्यालयात गेला. तहसीलदारांनी दादूचे म्हणणे ऐकले. व ते त्याला पुन्हा बीडीओ ऑफिसमध्ये घेऊन आले. तेथे अजूनही शिपायाशिवाय कुणीच नव्हते. वाट पाहून शेवटी तहसीलदारांनीच प्राथमिक आरोग्य केंद्राला फोन लावला. फोन खणखणत राहिला. बहुधा दवाखान्यात कोणीच नसावे, असे समजून तालुक्याच्या कॉटेज रुग्णालयात फोन लावला गेला. कॉटेज रुग्णालयातूनही तातडीने काहीच मदतीचे आश्वासन मिळाले नाही. तहसीलदारही वैतागले व दादूला बीडीओंची वाट पहायला सांगून निघून गेले.

दादूला स्वस्थ बसवेना. समोरच्या एसटीडी बूथ मध्ये जावून त्याने सरळ जिल्ह्याला सीईओंकडे फोन केला. साथ नियंत्रण पथक तातडीने पाठवण्याचे आश्वासन मिळाले.

दादू गावात पोहोचेपर्यंत साथ नियंत्रण पथकही गावात आले होते. पण तोपर्यंत पटकीच्या साथीने दोन बळी घेतले होते.

-(जाने ०४ मध्ये जि. ठाणे ता. मोखाडा येथील 'जनसुनवाई' मध्ये मांडली गेलेली घटना)

दादूच्या गावात घडले तसे मृत्यू गावोगाव घडतात. या मृत्यूंचा जाब कोणाला विचारणार? दैवाला? गावात उपलब्ध नसणाऱ्या डॉक्टरला? बीडीओंना? प्राथमिक आरोग्य केन्द्र की कॉटेजच्या डॉक्टरांना? कोण दाद घेईल? दादू एकट्याने हे कसे करणार?

हे प्रश्न असेच सोडून चालणार नाही. आपली उदासिनता झटकून चांगल्या आरोग्य सेवा मिळवण्यासाठी संघटित कृती करायला हवी. या कृतीचं आरोग्य संवाद हे एक माध्यम आहे.

साथरोग रोखण्यासाठी शासनातर्फे काय उपाययोजना, यंत्रणा राबविली जाते, समस्येच्या सोडवणूकीसाठी कोणाशी संपर्क करणे गरजेचे होते, या माहितीच्या अभावाने दादूला आपल्या गावातले मृत्यू रोखता आले नाहीत. ही झाली एक समस्या जिथे आरोग्य संवादाची गरज होती. आता आणखी अशाच काही प्रतिनिधिक समस्या पाहू.

## आरोग्य संवादाअभावी उद्‌भवणाऱ्या काही समस्या

- सरकारला गावच्या हिताचा आरोग्य उपक्रम राबवायचा आहे पण गावाची साथ मिळत नाही.
- अनेकदा आपल्या विकासासाठी तयार केलेल्या योजना आपला विचार न घेताच जाहीर होतात, अशावेळी आग रामेश्वरी बंब सोमेश्वरी असा प्रकार होतो.
- आपल्या भागात आरोग्य उपकेन्द्र मंजूर आहे पण जागा उपलब्ध होत नाही.
- गावाजवळ सरकारी दवाखाना आहे पण तेथे २४ तास डॉक्टर उपलब्ध नाहीत.
- दवाखान्यात रुग्ण व त्यांच्या नातेवाईकांना विनाकारण अपमानजनक वागणूक मिळते.

# प्राथमिक आरोग्य सेवा म्हणजे काय?

आपण विशेषतः प्राथमिक आरोग्य सेवांशी संबधित समस्यांचा विचार करत आहोत. म्हणून प्राथमिक आरोग्य सेवा म्हणजे काय हे समजून घेऊ. त्या आधी आरोग्याचा अर्थ समजून घेऊ. जागतिक आरोग्य संघटनेने म्हटले आहे की, केवळ आजारपण नसणे म्हणजे आरोग्य नाही. तर **शारीरिक, मानसिक व सामाजिक दृष्ट्या पूर्ण तंदुरुस्त असणे म्हणजे आरोग्य होय.**

याचा अर्थ शरीरात विकार नाही, मन निकोप आहे व समाजात, आपल्या गावात, वस्तीत सलोखा आहे अशी अवस्था म्हणजे आरोग्य. पण ज्या अवस्थेत आपण सर्वजण शरीराने तंदुरुस्त आहोत, मेंदूत दोष नाही व समाजात कोणत्याही वाईट गोष्टी नाहीत अशी अवस्था येणार कशी? याबद्दल आरोग्याची वरील व्याख्या काही सांगत नाही. पण तरी दूर पल्ल्याचे ध्येय म्हणून काय असायला हवे हे या व्याख्येतून पुढे येते.म्हणजेच अनारोग्य ही एकट्या दुकट्याची समस्या नसून एकूणच सर्व मानव जमातीला एकोप्याने नांदता येईल असे जग निर्माण करण्याची प्रक्रिया आहे.

आरोग्य आपण समजून घेतले. आता प्राथमिक आरोग्य सेवेचा अगदी थोडक्यात विचार करु. १९७८ साली त्या वेळच्या सोव्हिएत युनियन मध्ये अल्मा अटा या शहरात १३४ राष्ट्रांच्या अधिकृत प्रतिनिधींनी एक जागतिक आरोग्य परिषद भरवली होती. या परिषदेत '२००० सालापर्यंत सर्वांना आरोग्य' हे ध्येय जाहीर करण्यात आले. हे ध्येय गाठण्यासाठी प्राथमिक आरोग्य सेवा हा मार्ग वापरायचा ठरला. त्याआधीही विविध सरकारी समित्यांनी प्राथमिक आरोग्य सेवांचे धोरण स्पष्ट केले होते. या 'सर्वांना आरोग्य 'धोरणाची खालील वैशिष्ट्ये होती-

- आरोग्य समस्यांचे निराकरण व प्रतिबंध यासाठी जनजागृती
- पौष्टिक आहार पुरवण्यावर भर देणे
- सर्वांना स्वच्छ पाण्याचा मुबलक पुरवठा व सार्वजनिक स्वच्छता राखणे
- गरोदर स्त्रिया व बाळांच्या आरोग्याची विशेष काळजी घेणे
- कुटुंबनियोजन व रोगप्रतिबंधक लसटोचणी कार्यक्रम राबवणे
- विविध प्रदेशातील स्थानिक रोगांवर प्रतिबंधक उपाय, साधे आजार, जखमांवर स्थानिक उपचार व औषधपुरवठा करणे

वरील प्राथमिक आरोग्य सेवांचे धोरण प्रत्यक्षात राबवण्यासाठी गावागावात आरोग्यसेवक नेमण्यापासून उपकेंद्र, प्राथमिक आरोग्य केंद्र, ग्रामीण रुग्णालय अशी यंत्रणा उभारण्यात आली. या धोरणात आजार रोखण्यावर भर असल्याने ते राबवताना जनतेचा सहभाग महत्वाचा आहे. आणि सध्या नेमका तोच नसल्यामुळे शिवाय रोगांना रोखण्याएवजी रोग बरे करणाऱ्या खासगी बाजारपेठेचे हितसंबंध जपले गेल्याने आज प्राथमिक आरोग्य सेवांचे धोरणच गुंडाळले गेल्याचे दिसते. सन २००० पर्यंत या धोरणाप्रमाणे सर्वांना आरोग्य सेवा पुरवण्याचे वचन सरकारने दिले होतं.

**ज्या आरोग्य सेवा सर्वांसाठी असतात व ज्यात सर्वांची भागीदारी असते. ज्यांचा खर्च संपूर्ण समाज व देश उचलत असतो. आरोग्यासोबतच शिक्षण,पोषण, शेती, समाजाचा विकास, पशुपालन, घरे व गावाचा विकास अशा सर्व बाबींचा विचार यामध्ये केला जातो. या सेवा प्राथमिक आरोग्य सेवा असतात.**

सन २००० उलटून गेलं आहे. मात्र वरील प्राथमिक आरोग्य सेवा पोचवण्याचे ध्येय साधणे दूरच सरकार आपल्या भूमिकेपासूनच पळ काढत आहे. म्हणूनच पुढील आरोग्य संवादाचे मार्ग अवलंबून आपण सर्वांना आरोग्य सेवा मिळतील यासाठी प्रयत्न करु शकतो.

# आरोग्य संवादासाठी या पध्दती/मार्ग वापरता येतील

गावबैठक

आरोग्य कर्मचारी व गावकऱ्यांची बैठक

सरकारी दवाखान्यात आरोग्य संवाद

कॅलेंडर कार्यक्रम

खासगी डॉक्टरांशी आरोग्य संवाद

जनसुनवाई

# आरोग्य संवादासाठी गावबैठक

आजारपण ही ज्याची-त्याची व्यक्तिगत समस्या आहे हा गैरसमज आहे. आपण ज्या विहिरीचं पाणी पितो ते दूषित असेल, घराघरात कुपोषण असेल, गंभीर आजाऱ्यांना तातडीने दवाखान्यात नेता येईल असा रस्ताच गावाला नसेल, गटारांची, कचरापेटीची व्यवस्था नसल्याने घाणीचे साम्राज्य असेल व या कारणांमुळे आजारपण वाढले असेल तर या समस्या व्यक्तिगत आहेत का? अर्थातच नाही. म्हणूनच या समस्यांवर एकत्र येऊन चर्चा करुन योग्य मार्ग काढण्यासाठी आपण गावात सभा/बैठक आयोजित करू शकता.

आरोग्य हे मुळात पाणी, आहार, निवारा, आर्थिक-सामाजिक घटक इत्यादी घटकांवर अवलंबून असते. या अनेक घटकांपैकी आरोग्य सेवा हा एक घटक आहे. चांगल्या आरोग्य सेवा मिळण्यासाठी प्रयत्न करतानाच काही मूलभूत सेवांची मागणीही आपण करायला हवी. यातील काही घटकांबाबत ताबडतोबीने काही सुधारणा करणे शक्य आहे. अशा घटकांबाबत गावबैठकीत खालील मुद्यावर चर्चा करता येईल.

**आपल्या गावात** - १. वर्षभर पुरेसे पाणी, विशेषतः पिण्यायोग्य शुध्द पाणी सहज मिळते का?

२. रेशन दुकानातून पुरेसे धान्य, नियमितपणे मिळते का?

३. वर्षभर जवळच्या मोठ्या गावापर्यंत वाहतुक करता येईल असा चांगला रस्ता आहे का?

४. सार्वजनिक स्वच्छता आहे का? (दलदल, पाण्याची डबकी, साचलेला कचरा इ. होऊ नये यासाठी व्यवस्था आहे का?)

५. साथीच्या आजारांवर नियंत्रण आहे का? (गेल्या तीन वर्षात गावात कधी जुलाब, हिवताप, गोवर, कावीळ या आजारांची साथ आली होती का?)

वरील चर्चेतून आपल्या गावातील आरोग्य समस्यांचे ढोबळ स्वरूप आपल्याला समजू शकेल. त्याआधारे समस्या सोडवण्यासाठी सर्वांना मिळून व प्रत्येकाला काय करता येणे शक्य आहे हे ठरू शकते.

- **चांगले रेशन, पिण्यासाठी शुद्ध पाणी, रहदारीसाठी रस्ता, कचरापेटी या सेवा उपलब्ध नसतील तर त्या मिळवण्यासाठी ग्रामसभेत प्रश्न उपस्थित करा.**
- **साथरोगांची वर्दी ताबडतोब प्राथमिक आरोग्य केन्द्रापर्यंत पोचवण्याची व्यवस्था निर्माण करण्याचा आग्रह धरा.**
- **गावात जन आरोग्य समिती स्थापन करा. (जन आरोग्य समिती स्थापन करण्याबद्दलचा शासकीय ठराव परिशिष्ट १ मध्ये दिला आहे.)**

# आरोग्य कर्मचाऱ्यांशी आरोग्य संवाद

सरकारी आरोग्य सेवांची माहितीच नसल्याने आपण आरोग्य सेवा मिळण्यापासून वंचित राहतो. म्हणून आरोग्य कर्मचाऱ्यांशी संवाद साधून या सेवांची माहिती करून घ्यायला हवी.

### *आधी असं कधी झालं नव्हतं!*

*मु. पो. डहाणु, जि.-ठाणे, या आदिवासी भागात कष्टकरी संघटनेने पाड्यांवर अजब मिटींगा सुरू केल्या. पाड्यावर आदिवासी पोरंटोरं, बाया, दादले, म्हातारी माणसं जमुन नर्सबाई अन् आरोग्य सेवकांची भाषणं ऐकत. आता भाषणात अजब काय! तर नर्सबाईला गावात नेमून दिलेली कामे ती लोकांसमोर घडाघडा सांगते. नर्सबाई बोलायची, 'गरोदर बायांची मिटींग घेणे, जुलाब-तापावर गावात गोळ्या देणे, लसीकरण ही माझी कामं, ह्या भागातल्या पाच गावांची जबाबदारी माझ्यावर', यावर मिटींगीत एकच गलका होतो, 'नर्सबायने बायांची मिटींग कधी घेतलीच नाय', 'आरं घेणार कशी, एकटी बाय पाच गावं फिरणार कशी?' अशी चर्चा सुरु होते, नर्सबाईच्या घशात कोरड पडलेली, आपली नेमणूक लोकांच्या सेवेसाठी पण आपल्या कामाची ऊत्तरे आपण देतो अधिकाऱ्यांना! ... मलेरिया वर्करचीही हालत अशीच, लोक मात्र म्हणत होते, "नरसबाय न् आरोग्य सेवक गावात आले काय न् गेले काय, काय कळत नव्हतं, आता त्यांची कामं झाली का नाय त्याच्यात आमी लक्ष घालू. त्यांना मदत करू. एक खरं ह्याआधी हे असं कधी झालं नव्हतं!"*

आरोग्य कर्मचाऱ्यांशी आपण आपल्या गावात तसेच सरकारी दवाखान्यात जाऊन आरोग्य संवाद साधू शकतो. वरीलप्रमाणे गावात आरोग्य संवाद साधण्यासाठी आपल्याला गावात मिळणाऱ्या आरोग्य सेवा व गावपातळीचे आरोग्य सेवक कोणते यांची माहिती असणे आवश्यक आहे. ही माहिती पुढे दिली आहे

# आपल्याला गावात या आरोग्य सेवा मिळायला हव्यात-

सरकारचे आरोग्य-विषयक निरनिराळे कार्यक्रम आहेत. त्या सर्वांचा विचार केला तर आपल्या गावातच खालील सेवा मिळायला हव्या-

१. **गरोदर स्त्रियांना** भेटून त्यांना रक्तवाढीसाठी लोहाच्या गोळ्या, धनुर्वात विरोधी इंजेक्शन, सल्ला देणे. प्रशिक्षित दाईतर्फे बाळंतपण. बाळंतपणानंतर मातेची व बाळाची तपासणी, सल्ला व औषधे.

२. **लहानबाळांना**- निरनिराळ्या लसी, अंगणवाडीत बाळांना व विशेषतः कुपोषित बाळांना पूरक आहार, लोहाच्या गोळ्या. पाच वर्षाखालील बाळांना दर सहा महिन्यांनी 'अ' जीवनसत्वाचा डोस. गरोदर बायांना शेवटच्या ३ महिन्यात पूरक आहार.

३. हिवतापाच्या निदानासाठी काचेवर रक्ताचा थेंब घेऊन काच तपासणीसाठी पाठवणे, व हिवतापाच्या गोळ्या देणे. या रक्ततपासणीच्या रिपोर्ट प्रमाणे पुढील उपचार गरजेप्रमाणे करणे. डास प्रतिबंधक औषध-फवारणी व गप्पी माशांचा प्रसार.

४. क्षयरोग, कुष्ठरोग याच्या निदानासाठी थुंकीचा, कातडीचा नमुना घेणे व या तपासणीच्या रिपोर्ट प्रमाणे डॉक्टरांकरवी उपचार करण्यासाठी पाठपुरावा.

५. कुटुंब नियोजनासाठीच्या गोळ्या व निरोधचा पुरवठा, नसबंदी बाबत प्रचार व सल्ला-मार्गदर्शन

६. पुरूष व स्त्री आरोग्य सेवकाकडून सर्दी-ताप, अंगदुखी, जुलाब इ. साध्या आजारांवर उपचार.

७. **आदिवासी भागांमध्ये**, पावसाळ्यात पाडा स्वयंसेवकामार्फत गावातच साध्या आजारांवर उपचार व विहीरीत टी.सी.एल. पावडर टाकणे, या टी.सी.एल. चे प्रमाण योग्य आहे ना याची पाणी तपासून पाहणी करणे.

८. शाळेत **विद्यार्थ्यांची** दरवर्षी **आरोग्य तपासणी**.

महिला व पुरुष आरोग्य सेवक, प्रशिक्षित दाई, अंगणवाडी शिक्षिका हे गावपातळीवर आरोग्य सेवा देणारे अतिशय महत्वाचे आरोग्य कर्मचारी आहेत. या शिवाय आदिवासी भागात पाडा स्वयंसेवक आहेत. आजार पसरु नयेत, आजारांचा प्रतिबंध करण्यासाठी हे कर्मचारी महत्वाची भूमिका बजावतात. या आरोग्य कर्मचाऱ्यांच्या जबाबदाऱ्या आपल्याला माहीत नसतात. त्यामुळे ते गावात का येतात व काय करतात याचे महत्व गावकऱ्यांना वाटत नाही. परंतु आरोग्य कर्मचाऱ्यांचा गावाला खरोखर उपयोग व्हायचा असेल तर त्यांच्या कामात गावातील लोकांनीही मदत करायला हवी. यासाठी त्यांची कामे, जबाबदाऱ्या लोकांना समजायला हव्यात.

# गावात आरोग्य सेवा देणारे सरकारी आरोग्य सेवक

## या कर्मचाऱ्यांकडून आपल्याला गावातच आरोग्य सेवा मिळतात.

**आरोग्य सेविका** (ANM) **आरोग्य सेवक** (MPW) **प्रशिक्षित दाई** **अंगणवाडी सेविका**

## आरोग्य सेवक गावात येतात तेव्हा खालील आजारांवर उपचार करू शकतात

**ताप** **हिवताप** **खोकला** **जुलाब व पोटात जंत** **रक्तपांढरी/अशक्तपणा**

**उलटी** **अंगदुखी** **जखम** **त्वचा विकार** **डोकेदुखी**

वरील आजारांवरील उपचारांसोबतच आरोग्य सेवकांनी गावात आरोग्य जागृतीचे काम करणेही अपेक्षित आहे. पाड्यातील गरोदर महिलांची बैठक घेऊन त्यांना आवश्यक त्या सूचना देणे, गरोदरपणात कोणती काळजी घ्यावी हे समाजावून सांगणे, हिवताप, पटकी यासारखे साथरोग पसरु नयेत म्हणून जनजागृती करणे, कुटुंब नियोजनाचे महत्व पटवून देणे, लोकांनी निर्धुर चुलींचा वापर करावा यासाठी प्रयत्न करणे याबाबत हे आरोग्य सेवक प्रयत्नशील असायला हवेत.

**हे सर्व प्रयत्न आपल्या चांगल्या आरोग्यासाठीच आहेत. आपण त्यांना सहकार्य करायला हवे.**

# अंगणवाडी एक महत्वाची आरोग्य सेवा

कुपोषण घटवण्यासाठी केंद्र सरकारमार्फत राबवली जाणारी गावातील अंगणवाडी अर्थात एकात्मिक बाल विकास योजणा ही महत्वाची योजणा आहे. ही योजणा राबवण्यासाठी प्रत्येक गावात समाजकल्याण विभागातर्फे एका प्रशिक्षित अंगणवाडी कार्यकर्तीची नेमणूक केली जाते. अंगणवाडी मार्फत ० ते ६ वयोगटातील मुले व १५ ते ४५ वयोगटातील गरोदर स्त्रिया, स्तनदा माता व कुपोषित मुलांसाठी सेवा दिल्या जातात. अंगणवाडीतुन मिळणाऱ्या सेवा-

- **पूरक पोषण आहार-** अंगणवाडीतुन दर दिवशी वेगवेगळा पोषक आहार मिळणे अपेक्षित आहे. या पोषक आहारात खाद्यतेल, तूप, साखर, गूळ, मसाले इत्यादी पदार्थ वापरून मोड आलेली कडधान्ये (मटकी, चणा, वाटाणा), धान्ये (तूर अथवा मुगडाळ व तांदळाची खिचडी), शेंगदाणा अथवा राजगिऱ्याचे लाडू किंवा चिक्की, रव्याचा शिरा असे पदार्थ देणे अपेक्षित आहे.
- **लसीकरण**
- **वैद्यकीय तपासणी**
- **वैद्यकीय संदर्भ सेवा** (ज्या बाळांना डॉक्टरांनी तपासून उपचार द्यायला हवे असे अंगणवाडी कार्यकर्तीला वाटते अशा बाळांना डॉक्टरांतर्फे तपासणी व उपचार)
- **पूर्व प्राथमिक शिक्षण**
- **महिलांसाठी आरोग्य व पोषण शिक्षण**

वरील सेवांबद्दल आपण अंगणवाडी कार्यकर्तीकडून माहीती मिळवू शकतो. अंगणवाडीसाठी आवश्यक आहार शिजवण्यासाठी गावातील महीला मंडळातर्फे आपण पुढाकार घेऊ शकतो.

# आरोग्य कर्मचाऱ्यांना काही अडचणी आहेत का?

आरोग्य सेवकांकडून आपल्याला गावातच आरोग्य सेवा मिळायला हव्यात. तो आपला हक्क आहे. पण काही वेळा आरोग्य कर्मचाऱ्यांनाही या सेवा देताना अडचणी येतात. या अडचणी कोणत्या असू शकतील? ते आपण समजून घ्यायला हवे. यातली काही उदाहरणे खाली दिली आहेत-

१. महिला आरोग्य कर्मचाऱ्यांना एक महिला म्हणून काही अडचणी येतात उदा. दुर्गम गावात एकटीने फिरणे. काही वेळा दवाखाना गावापासून दुर आडनिड ठिकाणी उभारल्याने महीला कर्मचाऱ्यांना अशी जागा राहण्यासाठी धोक्याची वाटू शकते. परंतू आपण अशा महीला कर्मचाऱ्यांना आधार, धीर द्यायला हवा.

२. आरोग्य सेवांची धोरणे वरीष्ठ पातळीवर निश्चित होतात. उदा.- दर महीन्याला अमुक-ईतक्या कुटुंब नियोजनाच्या शस्त्रक्रिया व्हायलाच हव्यात हे वरीष्ठ पातळीवर ठरल्याने गावपातळीचे कर्मचारी केवळ ते धोरण राबवत असतात. गावकऱ्यांना मात्र डोळे येणे किंवा खरुज अथवा जुलाबाच्या साथीवर औषधांची तातडीने गरज असते. त्यावेळी ही औषधे न मिळता केवळ नसबंदीची केस मिळवण्यासाठी आरोग्य कर्मचारी गावात आल्यास त्यांना काही वेळा लोकांचा रोष पत्करावा लागतो.

३. आरोग्य कर्मचाऱ्यांनाही काही कौटुंबिक समस्या, जबाबदाऱ्या असू शकतात.

या आरोग्य सेवकांच्या समस्या समजावून घेऊन त्यांना मदत करणे हे आपले कर्तव्य आहे. तसेच आरोग्य सेवकांनीही कुणालाही अपमानकारक वाटेल अशी वागणूक देऊ नये. सर्वांना सन्मानाने आरोग्य सेवा मिळायला हव्यात.

# सरकारी दवाखान्यात आरोग्य संवाद

## जन आरोग्य समितीच्या शिष्टमंडळाने ग्रामीण रुग्णालयास भेट दिली

**कोल्हापूर, (ता. आजरा) : येथील ग्रामीण रुग्णालयाबाबत असलेल्या तक्रारींबद्दल एका शिष्टमंडळाने आज रुग्णालयाच्या वैद्यकीय अधिकाऱ्यांची भेट घेतली. दवाखान्यातून औषधे न मिळणे, सरकारी डॉक्टरांची खाजगी प्रॅक्टीस, केसपेपर व्यतिरिक्त रुग्णांकडून पैसे घेणे अशा तक्रारी शिष्टमंडळाने यावेळी केल्या. शिष्टमंडळाच्या प्रश्नांना ग्रामीण रुग्णालयाच्या वैद्यकीय अधिकाऱ्यांनी सविस्तर उत्तरे दिली.**

जन आरोग्य समिती, आजरा व श्रमिक मुक्ती दल या संघटनेने तालुक्यातील ग्रामीण रुग्णालयात सुधारणा व्हावी यासाठी प्रयत्न चालवले आहेत. समिती व संघटनेतर्फे उपस्थित केलेल्या प्रश्नांना उत्तरे देताना डॉक्टरांनी यापुढे प्रशासकीय वेळेत खाजगी दवाखाना चालवणार नसल्याचे आश्वासन दिले. केसपेपर व्यतिरिक्त रुग्णांकडून पैसे घेतले जाऊ नयेत म्हणून शिष्टमंडळाने डॉक्टरांच्या संमतीने, **'या दवाखान्यात कोणत्याही सेवेसाठी केसपेपर शिवाय पैसे स्विकारले जात नाहीत'** असा फलक चिकटवला. तसेच दवाखान्यात उपलब्ध औषधांची यादीही लोकांच्या माहितीसाठी फलकावर लावण्याचे मान्य केले गेले. शिष्टमंडळात शेतकरी बांधवांसहीत, प्राध्यापक विद्यार्थी व सामाजिक कार्यकर्त्यांचा समावेश होता.

ही बातमी वाचलीत का? बातमीतील घटनेप्रमाणे, आपल्या भागातील रुग्णालयाशी संबधित प्रश्नांची चर्चा रुग्णालयाच्या वैद्यकीय अधिकाऱ्यांसोबत आपण आयोजित करू शकतो.

प्रश्न उपस्थित करतांना ते प्रश्न सोडवण्यासाठी आपली सहकार्याचीही तयारी असावी. ग्रामीण रुग्णालय, प्राथमिक आरोग्य केंद्र, उपकेंद्र अशा विविध पातळ्यांवर असा आरोग्य संवाद आपण साधू शकतो. हा आरोग्य संवाद साधतांना काही पूर्वतयारी करायला हवी. ती कोणती हे जाणून घेऊ.

# आरोग्य-संवादासाठी पूर्वतयारी

शासकीय आरोग्य यंत्रणेशी आरोग्य-संवाद करतांना साधारणपणे ब्लॉक निवडणे जास्त सोईस्कर. ब्लॉकपातळीवर आरोग्य संवाद करण्यासाठी आपल्याला खालील गोष्टी कराव्या लागतील-

- कोणत्या विभागात संवाद आयोजित करायचा आहे, हे ठरविणे (एक तालुका, एक ब्लॉक इ.)

- आपल्या विभागासाठी अपेक्षित सेवांची यादी तयार करणे. (पुढे प्रत्येक पातळीवरील आरोग्य सेवांची माहिती दिली आहे. उदा.- प्राथमिक आरोग्य केन्द्रावर आरोग्य संवाद घडवायचा असल्यास प्रा.आ. केंद्रात अपेक्षित यादीचा वापर करावा )

- आरोग्य-संवादात भाग घेणारी १०-२० गावे निवडावी. शक्यतो अशी गावे निवडावी की ज्यावरुन संपूर्ण विभागाच्या प्रश्नांचे प्रतिनिधित्व होईल. विशेषतः जी गावे दुर्गम आहेत, आदिवासी किंवा दलित लोकसंख्या जिथे जास्त आहे, अशांचाही समावेश असावा.

- या गावांमध्ये चर्चा करून लोकांचा अनुभव व दृष्टीकोण समजून घ्यावा व लोकांमध्ये आरोग्य-सेवांबद्दल जागृती करावी. चर्चेमध्ये स्त्रियांची सक्रिय भागीदारी असावी.

- ज्या पातळीवर आरोग्य संवाद घडवायचा असेल त्या पातळीच्या आरोग्य अधिकाऱ्यांची आधी भेट घेऊन ठरावीक दिवस निश्चित केल्यास हे अधिकारी व संबधित कर्मचारी आरोग्य संवादास उपस्थित राहतील.

- सर्व सहभागी गावातील लोकांच्या प्रतिनिधींबरोबर शिबीर किंवा बैठक घेऊन एकूण परिस्थितीचे आकलन करणे व ती सुधारण्यासाठी कार्यक्रम ठरवणे. गावांमधून चित्ररूप प्रदर्शने, सह्यांची मोहीम, बैठका, सभा, पत्रके यामार्फत जागृती घडवल्यास सर्वांचा सक्रीय सहभाग घेणे शक्य होईल.

# विविध टप्प्यांवर अपेक्षित आरोग्य सेवा

उपकेंद्र, प्राथमिक आरोग्य केंद्र व ग्रामीण रुग्णालय यांच्या मार्फत कोणकोणत्या आरोग्य सेवा द्यायच्या हे आरोग्य खात्याने ठरवले आहे. त्याची माहिती खाली दिली आहे. कोणत्या पातळीवर कोणत्या सेवा अपेक्षित आहेत हे जाणून घेतल्यास आरोग्य अधिकाऱ्यांशी चर्चा करता येऊ शकेल.

## १) उपकेंद्र

उपकेंद्रामार्फत प्रथमोपचार, प्रसूतीपूर्व मातांची तपासणी किरकोळ आजारावर औषधोपचार, जलसंजीवनी पाकिटांचे वाटप, कुटुंब कल्याण, माता बाल संगोपन विषयक सल्ला व सेवा ह्या बरोबरच क्षयरोग, कुष्ठरोग व हिवतापाच्या रुग्णांचा शोध व उपचार केला जातो. आरोग्य सेविका/सेवक हे कर्मचारी आपल्या गावात आरोग्य सेवा पोचवतातच. या शिवाय तातडीचे व प्राथमिक उपचार, रोगप्रतिबंधासाठीचे उपाय करता यावेत यासाठी उपकेंद्र कार्यरत असते. मागास, डोंगराळ व आदिवासी भागात दर ३,००० व इतर भागात ५,००० लोकसंख्येमागे एक उपकेंद्र असायला हवे.

### उपकेंद्रातील कर्मचारी-

एक स्त्री-आरोग्य सेविका, एक आरोग्य सेवक (पुरुष) व एक महिला मदतनीस उपकेंद्रात असायला हवेत. या आरोग्य सेवकांच्या निवासाची व्यवस्था उपकेंद्राजवळ असायला हवी.

### उपकेंद्रात आवश्यक औषधे व साधने-

**औषधे -** रक्तवाढीसाठी गोळ्या, हाडांची बळकटी, संडास साफ न होणे, छातीत जळजळ, पोट डब्ब होणे, उलटी होणे, सर्दी-ताप, अंगदुखी इ. किरकोळ तक्रारींवर औषधे. तसेच बाळंतपणानंतरचा रक्तस्त्राव लवकर थांबवण्यासाठी औषधे, बाळंत स्त्रीची वार बाहेर पडण्यासाठी औषध इत्यादी विविध २७ आवश्यक औषधांचा कायम, पुरेसा साठा हवा.

**साधने -** रक्तदाब तपासण्याचे यंत्र (बी.पी. ॲपॅरेटस), निर्जंतुकीकरणाचे साधन (स्टरिलायजर इन्स्ट्रूमेंट), वजनकाटा, एका वेळी वापरले जाणारे (डीस्पोजेबल) बाळंतपणाचे किट.

### उपकेंद्रातून मिळणाऱ्या सेवा-

▪स्त्री-आरोग्य सेविकेतर्फे रोज दुपारी दवाखाना. ▪गरोदर स्त्रियांची नोंदणी ▪लहान बाळांना नियमित लस मिळणे. ▪गरोदर बायांची नियमित तपासणी व सल्ला-मार्गदर्शन. ▪आठवड्यातून एकदा डॉक्टरांची भेट, तपासणी व उपचार. ▪कुटुंब नियोजनाच्या साधनांचे मोफत वाटप.

## २) प्राथमिक आरोग्य केंद्र

प्राथमिक आरोग्य केंद्र म्हणजे ग्रामीण आरोग्य सेवेचा आधारस्तंभ. डोंगराळ/आदिवासी भागामध्ये वीस हजार लोकसंख्येमागे व इतर भागामध्ये तीस हजार लोकसंख्येमागे एक प्रा. आ. केंद्र असायला हवे असे सरकारचे उद्दिष्ट आहे. प्रा. आ. केंद्रात उपचारांसाठी केसपेपरचे ५ रुपये घेतले जातात. बाकी सर्व उपचार मोफत मिळायला हवे-

### प्रा. आ. केंद्रातील अपेक्षित कर्मचारी -

प्रत्येक प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये बीगर आदिवासी भागात १३ व आदिवासी भागात एकून १४ कर्मचारी कार्यरत असतात.

- निवासी डॉक्टर
- नर्स
- आरोग्य-सहाय्यक (स्त्री)
- आरोग्य-सहाय्यक (पुरुष)
- कंपांउंडर
- प्रयोगशाळा तंत्रज्ञ
- सफाई कामगार
- वाहनचालक

### प्रा. आ. केंद्रात आवश्यक औषधे-

अत्यावश्यक औषधांच्या सूचीनूसार ७० औषधांचा कायम व पुरेसा पुरवठा प्रा. आ. केंद्रात असावा. सर्पदंशविरोधी इंजेक्शन, कुत्रा चावल्यावर घ्यायची लस, हिवताप (मलेरिया), क्षयरोग (टी.बी.) व कुष्ठरोगावरील औषधे तसेच जुलाब, ताप यासारख्या साध्या आजारांवरील उपचारासाठीची औषधे प्रा. आ. केंद्रात असावीत.

### प्रा. आ. केंद्रातील काही आवश्यक साधने-

- रुग्णांना दाखल करुन घेण्यासाठी ६ खाटांची सोय
- शस्त्रक्रियागृह
- बाळंतपणाची खोली व बाळंतपणासाठी खास टेबल
- लसी ठेवण्यासाठी विशिष्ट प्रकारचा फ्रीज (ILR) / Deep Freezer
- निर्जन्तुकीकरण करण्यासाठीचे यंत्र
- सूक्ष्मदर्शक यंत्र
- २४ तास ॲम्ब्युलन्स सेवा

## प्रा. आ. केंद्रात मिळणाऱ्या सेवा-

* **बाह्यरुग्ण व आंतररुग्ण विभागातर्फे सेवा** - रोज सकाळ-संध्याकाळ डॉक्टरांचा दवाखाना (OPD) व गंभीर आजाऱ्याला दाखल करायची सोय.

* **लसीकरण** - क्षयरोग, पोलिओ, घटसर्प, डांग्या खोकला, धनुर्वात व कांजिण्या या महत्वाचे आजार रोखण्यासाठी लसीकरण कार्यक्रम

* **रोग प्रतिबंधक उपाय** - साथरोग पसरु नयेत म्हणून डास नियंत्रणासाठी औषध फवारणी, गप्पी माशांची पैदास व प्रसार, हत्तीरोग तपासणी व उपचार, रक्त नमुना चाचणी घेणे, पिण्याच्या पाण्याचे क्लोरिनने शुध्दीकरण, पाण्याची नमूना चाचणी व प्रबोधन इ. उपायांचे नियोजन

* **तातडीच्या सेवा** - साप चावणे, अपघात इ. साठी २४ तास तातडीची सेवा, गंभीर आजाऱ्याला कुटिर, ग्रामीण रुग्णालय इ. ठिकाणी पाठवण्यासाठी वाहनाची सोय

* **गरोदर स्त्रियांसाठी सेवा** - बाळंतपण आधीच्या व नंतरच्या तपासण्या, औषधोपचार, सल्ला मार्गदर्शन व बाळंतपणातील सेवा

* **संतती नियमनासाठी सेवा** - निरोध, गर्भनिरोधक गोळ्या इत्यादींचे मोफत वाटप, तसेच पुरुष व महिलांच्या मोफत कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया व सल्ला मार्गदर्शन तसेच गर्भपाताच्या मोफत सेवा

* **कायदा/ गुन्ह्याशी निगडीत सेवा** - बलात्कार, कौटुंबिक मारहाण, खून, अपघात इ. बाबतीत वैद्यकीय तपासणी व प्रमाणपत्र देणे तसेच शव विच्छेदन व मृत्यू प्रमाणपत्र देणे त्याच प्रमाणे नागरी सेवांकरिता जेष्ठ नागरिकांना आवश्यक वयाचा दाखला मोफत देणे

* **राष्ट्रीय आरोग्य कार्यक्रमांतर्गत सेवा** - हिवताप, कुष्ठरोग, हत्तीरोग, क्षयरोग, मोतिबिंदू इ. आजारांवर मोफत उपचार देणे या अंतर्गत मोतिबिंदूच्या शस्त्राक्रिया, क्षय/कुष्ठ रुग्णांना उपचार, कुपोषित मुलांची विषेश काळजी इ. सेवा

* **इतर सेवा** - गरजेनुसार रक्त, लघवी, थुंकींची साधी तपासणी, गळूमधील पू काढणे यासारख्या लहान शस्त्रक्रिया, जखमांना टाके घालून उपचार; हाड मोडण्यावरील प्राथमिक उपचार, अन्नातून विषबाधेवर व भाजण्यावरील प्राथमिक उपचार, लिंग सांसर्गिक रोगावरील उपचार, कातडीचे आजार तसेच कुपोषणजन्य व आयोडिन, अ-जीवनसत्व, लोह कमतरता या विकारांवर मोफत उपचार

## ग्रामीण रुग्णालय

प्रा. आ. केंद्रास पूरक संदर्भ सेवा देण्याचे काम ग्रामीण रुग्णालयातून होते. प्रत्येक पाच प्राथमिक आरोग्य केंद्रामागे एक ग्रामीण रुग्णालय असावे असे सरकारी धोरण आहे. विशेषज्ञ डॉक्टरांच्या सेवा देणाऱ्या ग्रामीण रुग्णालयाच्या आवारातच डॉक्टरांच्या निवासाची व्यवस्था असायला हवी.

- **ग्रामीण रुग्णालयातून मिळणाऱ्या सेवा -**

बाह्य रुग्ण सेवा नेहमीच्या (OPD), शस्त्रक्रिया व अवघड बाळंतपणासाठी शस्त्रक्रिया, त्यासाठी सुसज्ज शस्त्रक्रियागृह, बाळंतपणासाठी प्रसूति कक्षाची व्यवस्था, तीस आजाऱ्यांना दाखल करण्याची सोय, क्ष-किरण तपासणी, रक्त, लघवी तपासणी इत्यादी तपासण्या. यासाठी उपयुक्त कर्मचारी, साथीच्या आजारांवर लक्ष ठेवण्याची यंत्रणा इत्यादी सेवा ग्रामीण रुग्णालयात उपलब्ध असाव्यात.

**ग्रामीण रुग्णालयातील अपेक्षित कर्मचारी -**

प्रत्येक ग्रामीण रुग्णालयात बालरोगतज्ञ, स्त्री रोग तज्ञ, शल्यक्रिया तज्ञ, विशेषज्ञ असे चार तज्ञ डॉक्टर्स मिळून २५ कर्मचारी कार्यरत असायला हवेत. या शिवाय सुरक्षा रक्षक, वाहन, आहार व स्वच्छता सेवा देणारे कर्मचारी सध्या कंत्राटी पद्धतीने उपलब्ध केले जात आहेत.

| क्र. कर्मचाऱ्याचे नाव | किमान अपेक्षित सं. | क्र. कर्मचाऱ्याचे नाव | किमान अपेक्षित सं. |
|---|---|---|---|
| १. वैद्यकीय अधिक्षक | १ | ५. स्टाफ नर्सेस | ७ |
| २. वैद्यकीय अधिकारी (तज्ञ) | ३ | ६. एक्स-रे तंत्रज्ञ | १ |
| ३. वैद्यकीय अधिकारी(निवासी) | ३ | ७. कंपाऊंडर | २ |
| ४. प्रमुख नर्स | १ | ८. प्रयोगशाळा तंत्रंज्ञ व वाहन चालक | १ (प्रत्येकी) |

**उपकेंद्र, प्रा. आ. केंद्र व ग्रामीण रुग्णालयात पुरेशा पाण्याची व्यवस्था, वीजेची सोय, दवाखान्यापर्यंत पोचण्यासाठी पक्के रस्ते असतील तर या सर्व सेवांचा आपल्याला व्यवस्थित लाभ होऊ शकेल. या सेवांची कमतरता असल्यास आरोग्य कर्मचाऱ्यांसोबत आपणही या समस्या सोडवण्यासाठी प्रयत्न करायला हवेत. आपण निवडून दिलेले लोकप्रतिनिधी या समस्या सोडवण्यासाठी काय करत आहेत?**

# या सेवा मिळतात का याची पहाणी

सरकारी-आरोग्य यंत्रणेची माहिती आपण जाणून घेतली. या सेवा गावात मिळतात की नाही याची ठोस माहिती मिळवण्यासाठी आपण खालील प्रश्नांचा आधार घेऊ शकतो.

या प्रश्नांच्या आधारे गावपातळीवर मिळणाऱ्या आरोग्य सेवांचे मूल्यमापन कार्यकर्त्यांनी कसे करावे, हे देखील पुढे दिले आहे. गावकऱ्यांची एक बैठक घेऊन खालील मुद्द्यांच्या आधारे सामुदायिक चर्चा घडवून या प्रश्नांची उत्तरे मिळवता येतील.

**गावात / उपकेंद्रात**

१. गावातील सर्व सहा वर्षांखालील मुलांना अंगणवाडीत रोज पूरक आहार मिळतो का?

२. उपकेंद्रात दररोज साध्या आजारांवर औषधोपचार व आवश्यक औषधे मिळतात का?

**प्राथमिक आरोग्य केंद्रात**

१. प्राथमिक आरोग्य केंद्रात सर्व आवश्यक ती औषधे मोफत मिळतात का? तिथले डॉक्टर बाहेरचे औषध लिहून न देता, आरोग्य केंद्रातल्याच औषधांनी उपचार करतात का?

२. प्राथमिक आरोग्य केंद्रात आठवड्यातले सर्व दिवस, २४ तास डॉक्टर उपलब्ध असतात का?

३. सामान्य बाळंतपणाची सोय आणि वेळ पडल्यास रुग्णाला भरती करण्याची सोय दवाखान्यात आहे का?

**ग्रामीण रुग्णालयात**

१. ग्रामीण रुग्णालयात चार तज्ञ डॉक्टर आहेत का? तिथे अवघड बाळंतपण किंवा इतर आजारांसाठी शस्त्रक्रिया केली जाते का?

२. ग्रामीण रुग्णालयात क्ष-किरण तपासणीची सोय आहे का?

या तीन केंद्रांमार्फत अनेक सेवा मिळतील असे सरकारचे जाहीर धोरण आहे. प्रत्यक्षात या केंद्रांची स्थिती कशी आहे, कोणत्या सेवा कितपत मिळतात याची पध्दतशीर पाहणी करण्यासाठी 'जन आरोग्य अभियान' ने एक तपशीलवार प्रश्नावली बनवली आहे. तिच्या आधारे एखादी संस्था/संघटना अशी पाहणी करु शकते. या प्रश्नावली साठी 'साथी' शी संपर्क साधावा. वर दिलेले प्रश्न केवळ नमुन्यादाखल आहेत. पध्दतशीर पाहणी करण्यासाठी या प्रश्नावलीचा उपयोग करणे योग्य ठरेल.

# आरोग्य संवादाचा पाठपुरावा- कॅलेंडर कार्यक्रम

विविध पातळ्यांवर सरकारी आरोग्य यंत्रणेशी आरोग्य संवादाबद्दलची माहिती आपण घेतली. आपल्या भागातील आरोग्य सेवांचा दर्जा सुधारण्यासाठी व या सेवा योग्य रितीने मिळवून घेण्यासाठी आरोग्य संवाद हा मार्ग आहे. परंतु ही प्रक्रिया सातत्याने चालू राहणे देखील महत्वाचे आहे. यासाठी त्याचा पाठपुरावा आरोग्य सेवा कॅलेंडर कार्यक्रमाने होऊ शकतो. या पद्धतीची आता आपण माहिती घेवू-

गावपातळीवर आपल्याला स्त्री आरोग्य सेविका (ANM) व पुरुष आरोग्य सेवक (MPW) यांच्याकडून आरोग्य सेवा मिळतात. या दोन्हीही आरोग्य सेवकांनी आपल्या गावात येऊन नियमितपणे लसीकरण, गरोदर मातांना सल्ला देणे, विशिष्ट आजारांचा पाठपुरावा, पाण्याचे निर्जंतुकीकरण, साध्या आजारांवरील उपचार इ. सेवा देणे अपेक्षित आहे. बहुतेक वेळा आपल्याला या सेवकांची कामे माहीत नसतात किंवा माहीत असली तरी ते कोणत्या दिवशी गावात येतात हे समजू शकत नाही. यावर उपाय म्हणून गावातील लोक या सेवकांच्या कामांवर **आरोग्य सेवा कॅलेंडर** द्वारे देखरेख ठेऊ शकतात व त्यांना कामात सहकार्य करू शकतात.

## आरोग्य कॅलेंडर उपक्रम कसा राबवावा?

- गावात बैठक आयोजित करावी. या बैठकीत आरोग्य सेविका/सेवक, अंगणवाडी कर्मचारी अशा गावात आरोग्य सेवा देणाऱ्या आरोग्य सेवकांना बोलवावे. त्यांच्या सर्व कामात गावकरी त्यांना सहकार्य करतील ही खात्री या बैठकीतून त्यांना मिळायला हवी.
- बैठकीत उपस्थित झालेल्या आरोग्य सेवकांना त्यांच्या गावातील जबाबदाऱ्या सर्वांच्या माहितीसाठी सांगण्याची विनंति करावी. सांगितलेल्या जबाबदाऱ्या पूर्ण होत नसल्यास त्यांच्या कारणांची चर्चा घडवावी.
- आरोग्य कर्मचाऱ्यांच्या महिन्यातून किती गावभेटी होतात? कोणत्या गावभेटीत कोणते काम प्रामुख्याने अपेक्षित असते? गावकऱ्यांना त्यांच्याकडून कोणत्या सहकार्याची अपेक्षा आहे? आरोग्य सेकांना कोणत्या कामात गावकऱ्यांची मदत मिळू शकते? साधारणतः या मुद्दयांवर चर्चा घडवावी.
- गावात कोणत्या तारखेस कोणते काम होईल याचे वेळापत्रक आरोग्य सेवकांकडून घ्यावे. प्रत्येक प्रा.

आ. केंद्रात आरोग्य कर्मचाऱ्याच्या गावभेटी व कामांचे असे वेळापत्रक बनवलेलेच असते.

त्याची गावातल्या नियोजनाला मदत होईल. आरोग्य सेवकांनी सांगितलेल्या तारखा व त्या दिवशीची सेवा एका कॅलेंडरवर नोंदवाव्यात. हे कॅलेंडर म्हणजे एक प्रकारे आरोग्य सेवकांचे वर्क मस्टर ठरेल.

● आता कॅलेंडर वर लसीकरण, रक्तनमुना घेणे, माता बैठक इ. कामांची तारीखवार नोंद येईल. या नोंदी प्रमाणे त्या त्या तारखेला ते ते काम होईल यासाठी गावकरी सहकार्य करतील. काम न झाल्यास त्या निश्चित तारखेवर फुलीचे चिन्ह **(X)** करतील. यामुळे कोणते काम झाले नाही, काय अडचण होती याची नोंद गावात सर्वांसाठी उपलब्ध होईल. तसेच कोणत्या दिवशी कोणती सेवा मिळणार हे आधीच समजल्याने लोकही त्याप्रमाणे आपल्या कामांचे नियोजन करु शकतील.

● हे कॅलेंडर गावात चावडी, ग्रामपंचायत कार्यालय, रेशन दुकान इ. अशा सार्वजनिक ठिकाणी लावावे ज्यामुळे त्यावर नोंदवलेली कामे सर्वांना कळतील.

## कॅलेंडर कार्यक्रमातून काय होईल?

- गावपातळीवर उपलब्ध असणाऱ्या सरकारी सेवांची माहिती गावकऱ्यांना मिळेल.
- कोणती सेवा कोणत्या दिवशी मिळेल याचे मासिक वेळापत्रक माहीत होईल. त्यामुळे या सेवा मिळण्यात सुधारणा होईल.
- सरकारी आरोग्य सेवकांना गावकऱ्यांचे सहकार्य मिळेल.
- गावपातळीवरील आरोग्य सेवांमध्ये नियमितपणा येऊ शकेल.
- आरोग्य सेवांच्या नियोजनात लोकांचा सहभाग राहील.

# खासगी डॉक्टरांशी इंजेक्शन-सलाईनच्या दुरुपयोगा बद्दल आरोग्य संवाद

## इंजेक्शन- सलाईनची फसवणूक थांबवली पाहिजे!

डहाणू तालुक्यातील पाड्या-पाड्यावर इंजेक्शन- सलाईन जागृती मोहीम मे २००० मध्ये राबवली गेली. 'सलाईन म्हणजे भारी इलाज!' व 'इंजेक्शन शिवाय बरे वाटणार नाही' असे समज समाजात खोलवर रूजले आहेत. याबद्दलची शास्त्रीय तत्थे समजावून सांगण्यासाठी गावात मिटींग व्हायची. चित्ररूप पोस्टर्स प्रदर्शनातून मुद्दा समजावला जायचा.. या जागृतीचा परिणाम झाला तो असा-

डहाणूच्या खाजगी डॉक्टरांच्या दवाखान्यात आदिवासी स्त्रिया व पुरूष आरोग्य संवाद पदयात्रा घेवून आले. डॉक्टर दवाखान्यातून बाहेर आले की प्रश्न विचारले जायचे, सलाईनची किंमत किती? उत्तर "२०-२५ रु." असायचे. मग जमाव विचारायचा "पण डॉक्टर तुम्ही एका बाटलीचे १०० रु. घेता, असे का?" इंजेक्शन बद्दलही असेच व्हायचे. मग इंजेक्शन सलाईन लावण्याची खरी गरज केव्हा आहे याबद्दल व इंजेक्शन /सलाईन बद्दल प्रबोधन करणारी दोन पोस्टर्स डॉक्टरांच्या संमतीने दवाखान्यात चिकटवली जात.

डॉक्टरांचा निरोप घेताना ही फसवणूक थांबावी म्हणून "आम्हीही इंजेक्शन /सलाईन विनाकारण मागणार नाही तुम्हीही देऊ नका" अशा आशयाचे 'प्रिय डॉक्टर' हे पत्र डॉक्टरांना दिले जायचे.

सरकारी आरोग्य सेवा काही घोषित उद्दिष्टांसाठी काम करते आणि त्याबाबत लोक जाब विचारु शकतात. पण खासगी सेवेबद्दल परिस्थिती वेगळी आहे. खासगी दवाखान्यात डॉक्टर - माझ्यावर बंधन आणणारे तुम्ही कोण?' असे म्हणू शकतात. म्हणून खासगी डॉक्टरांबरोबर संवाद करताना आपल्याला सामाजिक संदर्भ आणि शास्त्रीय उपचारांचे नियम यांचा आधार घ्यावा लागतो.

आपण खासगी डॉक्टरांबरोबर चर्चा करु शकतो असे इंजेक्शन व सलाईनच्या शास्त्रीय वापराबद्दलचे मुद्दे आपण घेऊ शकतो. सर्वांच्या संमतीने काही तत्वे ठरवू शकतो. वैद्यकीय शास्त्रामध्ये फक्त काही विशेष परिस्थितीत रोग्याला सलाईन लावायची गरज असते, याबद्दल दुमत नाही. डॉक्टरांनी अनावश्यक सलाईन लावण्याचा प्रकार, डॉक्टर नसलेला एक साधारण कार्यकर्ता सुध्दा ओळखू शकतो. या मुद्दयावर आधी

लोकांना किमान माहिती दिली पाहिजे व जागृती झाली पाहिजे. यासाठी 'प्रिय डॉक्टर ' पत्राचा उपयोग होईल. (हे पत्र पुढील पानावर दिले आहे). या पत्रामध्ये लोकांतर्फे डॉक्टरांना विनंती केली आहे. गावोगावी बैठका घेऊन लोकांना माहिती देऊन, पत्रावर लोकांच्या सह्या घेता येतील. डॉक्टरांना भेटतांना, त्यांना हे पत्र द्यावे.

हा मुद्दा घेऊन डॉक्टरांच्या संघटनेबरोबर किंवा व्यक्तिगत पातळीवर काही डॉक्टरांबरोबर चर्चा करता येईल. चर्चेमध्ये सलाईन लावायची गरज नेमकी केव्हा असते हे एकमताने ठरवता येईल. सलाईन म्हणजे मिठाचे पाणी हे पोस्टर डॉक्टरांच्या दवाखान्यात लावता येईल.

तसेच गरज नसताना इंजेक्शन देण्याचा मुद्दा ही घेता येईल. याबद्दलसुध्दा काही शास्त्रीय नियम पाळले पाहिजेत यासाठी डॉक्टरांबरोबर चर्चा करता येईल. साथी या संस्थेने प्रकाशित केलेले इंजेक्शन व सलाईन च्या दुरुपयोगाबाबत प्रबोधन करणारी पोस्टर्स या मोहिमेसाठी वापरता येतील. (ही पोस्टर्स परिशिष्ट ६, ७ मध्ये दिली आहेत.)

शहरांमध्ये I.C.U. (Intensive Care Unit) - येथे उपलब्ध असणाऱ्या किमान सोयींचा मुद्दा ही घेता येईल.

## इंजेक्शन-सलाईनच्या दुरुपयोगाबद्दल आरोग्य संवादामुळे काय साधेल ?

* लोकांमध्ये इंजेक्शन व सलाईनबद्दल अनेक गैरसमज आहेत. हे गैरसमज बळावल्याने रुग्णांनाच तोटा होतो शिवाय जे डॉक्टर रुग्णांची फसवणूक होऊ नये, त्यांना शास्त्रीय उपचारच मिळावेत अशा मताचे असतात त्यांनादेखील चुकीचे उपचार केवळ रुग्णांच्याच मर्जीखातर करावे लागतात. या दुरुपयोगाबद्दल आरोग्य संवाद केल्याने लोकांमध्ये प्रबोधन होण्यास मदत मिळेल.
* जे डॉक्टर सर्रास चुकीचे उपचार करुन रुग्णांना लुबाडतात त्यांच्यावर नियंत्रण यायला मदत मिळु शकेल.
* डॉक्टर रुग्णांचे समान नाते बळावण्याला मदत मिळू शकेल.

**इंजेक्शन-सलाईनच्या दुरुपयोगाबाबत महाराष्ट्रात २००० साली 'जन-आरोग्य-संसद' मोहीमेत ठिकठिकाणी खाजगी डॉक्टरांशी यशस्वी संवाद झाले. २००४ मध्ये कोल्हापूर जिल्ह्यात आजरा येथे श्रमिक मुक्ती दलाने याच मुद्यावर प्रबोधन पदयात्रा आयोजित केली. या पदयात्रेत शाळेतल्या विद्यार्थ्यांसहित गावकरी सामील झाले. डॉक्टरांच्या स्थानिक संघटनेनेही या पदयात्रेला पाठिंबा दिला.**

## डॉक्टरांना जाहीर पत्र

प्रिय डॉक्टर,

इंजेक्शन व सलाईन याचा दुरूपयोग टाळण्यासाठी आम्ही तुम्हाला हे विनंती पत्र लिहीत आहोत.

आरोग्य शिक्षणामुळे आता आम्हाला समजले आहे की, साध्या आजारात इंजेक्शनची सहसा गरज नसते. गंभीर आजार, बेशुध्दी व सतत उलट्या, काही लसी व काही खास औषधे, फक्त यांच्यासाठी इंजेक्शनची गरज असते. तसेच इंजेक्शन घेण्यामध्ये काही धोके असतात. त्यामुळे साधा ताप, खोकला, पोटदुखी, अंगदुखी, अशक्तपणा यासाठी आम्ही तुमच्याकडे इंजेक्शन मागणार नाही व तुम्हीही अशा आजारात इंजेक्शन देऊ नये, ही विनंती. आम्ही कष्टाने मिळवलेले पैसे अकारण इंजेक्शनवर खर्च होणे, हे यापुढे थांबले पाहिजे.

आम्हाला याचीही जाणीव आता झाली आहे, की सलाईनची बाटली म्हणजे शुध्द मिठाच्या पाण्याची बाटली असते. बेशुध्दी, सतत उलट्या, वेगाने रक्तस्त्राव, गंभीर शोष, गंभीर आजार, शस्त्रक्रिया, थेंब थेंब औषध सतत शरीरात देणे, अशा प्रसंगी फक्त सलाईनची गरज असते. इतर वेळी सलाईन देणे-घेणे चुकीचे आहे. सलाईनने ताकद येत नाही. जो आजारी पाणी पिऊ शकतो त्याला सहसा सलाईन द्यायची गरज नसते. त्यामुळे आम्ही तुमच्याकडे अशा वेळी सलाईनच्या किंवा ग्लुकोजच्या बाटलीची मागणी करणार नाही. तुम्हीही अकारण बाटली आजाऱ्याला लावू नये, ही विनंती.

सलाईनची बाटली, त्याची नळी, सुई मिळून डॉक्टरला एका बाटलीमागे २०-२५ रुपये खर्च येतो. त्यामुळे दर बाटलीमागे ५० रुपयांपेक्षा जास्त पैसे घेता कामा नयेत. आम्ही मोठ्या कष्टांनी मिळवलेला पैसा अकारण इंजेक्शन व सलाईनवर खर्च होऊ नये यासाठी आपण सहकार्य करावे, अशी आम्ही मागणी करतो.

आपले,

जागरुक नागरिक

# आरोग्य सेवाच्या हक्कांकरिता जनसुनवाई

आरोग्य सेवा सुरळीत व सन्मानाने मिळाव्यात यासाठी आरोग्य संवाद हे माध्यम आहे, सरकारी आरोग्य कर्मचाऱ्यांशी संवाद व लोकजागृती मार्फत आपण गावपातळीच्या आरोग्य सेवा मिळवू शकू. परंतु सरकारी सेवेवर व्यापक जनमताचा दबाव आणणेही गरजेचे आहे. असा दबाव जन सुनवाई मार्फत शक्य आहे. आरोग्य सेवांचा हक्क प्रस्थापित करण्याच्या मोहिमेत 'जन सुनवाई' हे महत्वाचे माध्यम आहे.

## जन सुनवाई कशासाठी?

दवाखान्यात सर्पदंशावरील लस शिल्लक नसल्याने रुग्णाचा मृत्यू झाला, दवाखान्याची अँब्युलन्स नादुरुस्त असल्याने उपयोगात आणली जात नाही अशा घटना अनेकदा घडतात व थोड्या दिवसात विसरल्याही जातात. सरकारी दफ्तर दिरंगाई, विशिष्ट कामासाठी निधिच नसणे, आरोग्य कर्मचाऱ्यांची निष्काळजी वृत्ती इ. कारणे या घटनांमागे असतात. परंतु सर्वांनाच आपला हक्क असलेल्या या सेवा मिळाल्या नाहीत म्हणून दाद मागता येत नाही. जन सुनवाईद्वारे अशा घटनांना जनतेसमोर आणून त्या पुन्हा घडणार नाहीत यासाठी जनमताचा दबाव आणता येईल. तसेच डॉक्टर्स व इतर कर्मचाऱ्यांची उपलब्धता; दवाखान्याची इमारत, तेथील स्वच्छता, वीज, पाणी इ. सोयी; औषधांचा पुरवठा; अँब्युलन्स, क्ष-किरण यंत्र यांची स्थिती इत्यादी विविध पैलूंबाबत आपल्या तालुक्यात, भागात काय परिस्थिती आहे त्याची पाहणी करुन ती प्रकाशात आणणे हे ही करता येईल.

जन आरोग्य अभियान मार्फत राज्यात व देशात विविध पातळयांवर 'आरोग्य सेवांचा हक्क' या विषयावर 'जन सुनवाई' आयोजित झाल्या आहेत. अशी जनसुनवाई आयोजित करताना खालील बाबी विचारात घ्याव्यात-

**१) सरकारी आरोग्य सेवांच्या उपलब्धतेविषयी माहिती जमवणे**

आपापल्या भागातील सरकारी प्रा.आ. केन्द्रे, ग्रामीण रुग्णालय यांची माहिती जमवून ती प्रत्यक्ष जन सुनवाईत अकार्यक्षम व अपुऱ्या आरोग्य सेवांचा ठोस पुरावा म्हणून मांडता येऊ शकते. (ही माहिती मिळवण्यासाठी पा.क्र. २५ वर उल्लेखिलेल्या प्रश्नावली चा आधार घ्यावा.)

**२) जनसुनवाईतील जनतेचे पक्षकार**

आपणच या जनसुनवाईत जनतेचे पक्षकार म्हणून भूमिका निभावतो. यासाठी सरकारी यंत्रणेवर अतिशय संयमाने व मुद्देसुदपणे माहितीपूर्ण मुद्दे, माहिती मांडायला हवी.

**३) जनसुनवाईतील सरकार पक्ष - शासकीय आरोग्य अधिकारी**

आपण ज्या पातळीवर जनसुनवाई आयोजित करत आहोत त्या पातळीवरील धोरणात्मक निर्णय घेणारे

अधिकारी या जनसुनवाईत सरकार पक्ष म्हणून उपस्थित असणे आवश्यक आहे.

शिवाय ज्या प्रा. आ. केन्द्र, ग्रामीण रुग्णालय यांच्याबाबतच्या तक्रारी जनसुनवाईत उपस्थित केल्या जातील तेथील वैद्यकीय अधिकारीही या जनसुनवाईत उपस्थित केलेल्या प्रश्नांवर खुलासा देण्यासाठी हजर असायला हवेत.

**४) समाजाभिमुख तज्ञ पॅनेलची टीका-टिपण्णी**

दोन्ही पक्षकारांची बाजू ऐकून, गरज पडल्यास बाजू मांडतांना पक्षकारांना थांबवून स्पष्टीकरण मागू शकणारे, तसेच माहितीची सत्यता पडताळून त्याबाबत मत देणाऱ्या तीन-चार तज्ञांच्या पॅनेलची जनसुनवाईत महत्वाची भूमिका आहे. पॅनल मध्ये सामाजिक, आरोग्य, पत्रकारिता, अशा विविध क्षेत्रातील मान्यवर असावेत. त्यांच्या वक्तव्यांना, मतांना समाजात व्यापक मान्यता असल्यामुळे त्यांनी दिलेल्या मताचा पुढे गंभीरतेने विचार होऊ शकतो. शिवाय जनमत घडवण्यातही अशा तज्ञांच्या मताचा उपयोग होऊ शकतो.

**५) पॅनेलचा अहवाल**

जनसुनवाईत जनतेची बाजू मांडल्यानंतर व सरकारी पक्षाने त्यावर दिलेल्या खुलाशानंतर पॅनेल परस्पर विचार-विनिमय करून आपले स्वतंत्र मतप्रदर्शन करेलच शिवाय शक्य झाल्यास पॅनेलतर्फे एक लेखी अहवाल घेवून हा अहवाल राष्ट्रीय मानवाधिकार आयोगास पाठविल्यास मोहीम सशक्त होण्यास त्याचा उपयोग होऊ शकेल.

**६) जनसुनवाईचा प्रस्तावित आराखडा**

- जनसुनवाईची प्रस्तावना
- संस्था /संघटनांनी मिळवलेल्या माहितीची मांडणी
- काही व्यक्ती ज्यांना आरोग्य सेवा नाकारल्या आहेत अशांची छोटी मांडणी (केस स्टडी)
- सरकार पक्षाकडून खुलासा/ठोस आश्वासने मिळवणे
- पॅनेलचे विचार-विनिमय करुन मत प्रदर्शन
- जनसुनवाईतून पुढे आलेल्या मुद्दयांबाबत ठोस मागण्या व आंदोलनाची पुढील दिशा स्पष्ट मांडणे
- समारोप

जनसुनवाईचे स्वरुप वरील प्रकारे असावे. स्थानिक नियोजनानुसार जन सुनवाई अधिक प्रभावी होऊ शकते

**सरकारी घोषित धोरणानूसार आपल्या हक्काच्या आरोग्य सेवा मिळाल्या नाहीत, नाकारल्या अशा घटनांना वाचा देणे, त्या जनतेसमोर आणणे, समाजातील प्रतिष्ठित-मान्यवरांच्या या घटनांबद्दलच्या चिंतेचा, काळजीचा दबाव सरकारी यंत्रणेवर आणणे व जनतेसमोर सरकारी अधिकाऱ्यांना त्याबद्दलचे उत्तरदायित्व स्विकारण्यास भाग पाडणे, त्यांतून जनमताचा दबाव तयार करणे यासाठी आरोग्य जन सुनवाई हे माध्यम आहे.**

# जिल्हा आरोग्य यंत्रणा लोकाभिमुख बनविण्यासाठी ग्रामपातळीवर ग्रामसभे अंतर्गत समिती स्थापन करणे

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०००/प्र.क्र.२६१/कुक-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १० नोव्हेंबर, २०००

**प्रस्तावना :**

प्राथमिक आरोग्य हा विषय जिल्हा परिषदेकडे सोपविण्यात आलेला आहे. सदर विषयासाठी कार्यान्वित करण्यात आलेली आरोग्य यंत्रणा पूर्णपणे लोकाभिमुख होणे अत्यंत गरजेचे आहे. शासनाने ज्या लोकांसाठी सुविधा पुरवावयाची आहे शक्यतो त्यांचे प्रत्यक्ष नियंत्रण संबंधित यंत्रणेवर असावेत असे तत्व स्वीकारले आहे व ह्या तत्वास अनुसरून ग्राम सभेअंतर्गत आरोग्य समिती स्थापन करण्याची बाब विचारात घेण्यात आली आहे.

**शासन निर्णय :-**

ग्राम पातळीवरील आरोग्य यंत्रणा लोकाभिमुख होण्यासाठी शासनाने ग्रामसभे अंतर्गत आरोग्य समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे राहील. :-

१. प्रत्येक ग्रामपंचायत क्षेत्रातील प्रत्येक गांवातून किमान ३ सदस्य असावेत.
२. ७० टक्के सदस्य महिला असाव्यात.
३. ग्रामपंचायत किंवा जिल्हा परिषदेच्या सदस्यांची संख्या एकूण ५ पेक्षा अधिक नसावी.
४. सदर समितीवर १५ सदस्य असावेत.
५. समितीने स्वतःच अध्यक्षांची निवड करावी. अध्यक्षांचा कार्यकाळ ३ महिन्यांचा असावा.
६. ग्रामसेवक हे या समितीचे आयोजक राहतील व समितीच्या कामकाजाचा तपशील ठरवण्याची जबाबदारी त्यांचेवर राहील.
७. समितीचा कार्यकाळ एक वर्ष राहील. मात्र सदस्य पुर्ननियुक्तीस पात्र राहतील.

समितीच्या कार्याचे स्वरूप खालीलप्रमाणे राहणार आहे :-

**अ.** सदर समितीची बैठक महिन्यातून एकदा घेण्यात येईल. या बैठकीत खाली नमूद केलेल्या विषयांची सहाय्यक परिचारिका प्रसाविका व बहुउद्देश कर्मचारी समितीस माहिती देतील. :-

१. ठरलेल्या दिवशी दिलेली ग्रामभेट.

२. अ. गरोदर मातांची नोंदणी - १६ आठवड्यांच्या आत.

ब. गरोदर मातांची नोंदणी - १६ आठवडयाच्या वर.

३. गरोदर मातांची ७ व्या महिन्यापासून तपासणी.

४. गरोदर मातांना लोहयुक्त गोळया व टी.टी.लस.

५. जास्त रक्तदाब किंवा अशक्तपणा असलेल्या स्त्रीयांची वैद्यकीय अधिकाऱ्यांकडून तपासणी.

६. बालमृत्यू

७. कुपोषित ग्रेड ३/४ मुलांच्या बाबतीत माहिती.

८. लसीकरण.

९. पिण्याच्या पाण्याची स्वच्छता.

१०. मलेरिया, कुष्ठरोग, रातआंधळेपणा इत्यादि बाबतीत माहिती.

११. पात्र जोडप्यांची भेट घेवून त्यांना कुटुंब कल्याण साधन वापरण्यास/शस्त्रक्रिया करून घेण्यास प्रवृत्त करणे.

**ब.** एखाद्या कर्मचाऱ्यांचे काम असमाधानकारक असल्यास समितीने नमूद केल्यानंतर जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद किंवा त्यांनी नामनिर्देशित केलेले अधिकारी यांनी प्रत्यक्ष चौकशी करावी व तद्नंतर आवश्यकतेनुसार योग्य ती कार्यवाही करावी. सदर समितीने सहाय्यक परिचारिका प्रसाविका तसेच बहुउदेशीय कर्मचारी यांच्या कामाचे मूल्यमापन करून संबंधीत वैद्यकीय अधिकारी व गटविकास अधिकारी पाठवावे व त्यांनी संबंधितांचा गोपनीय अहवाल लिहिताना याचा विचार करावा.

**क.** सदर समितीचे अहवाल ग्रामसभेच्या वर्षात चार होणा-या वैधानिक बैठकीत सादर करण्यात यावेत. हा शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

सुधीर श्रीवास्तव
सचिव (कुटुंब कल्याण)

परिशिष्ट- २

# आरोग्य सेवा महासंचालनालय, मुंबई
## महाराष्ट्र शासन

संदर्भ : सआसे/निविमु/आरोग्य संस्था/सूचना फलक/कक्ष-७ दिनांक : ७/१२/२०००

विषय : **आरोग्य संस्थांमध्ये सूचना फलक लावणेबाबत**

प्रिय डॉ.

आपणांस विदितच आहे की, आरोग्य हा प्रत्येकाचा मुलभूत अधिकार आहे असे म्हटले जाते. परंतु मला खेदाने नमूद करावेसे वाटते की, प्रत्यक्षात हा अधिकार सातत्याने नाकरला जात आहे. विशेषतः ग्रामीण भागातील जनतेमध्ये हे प्रमाण जास्त आढळून येते व याचे मुख्य कारण म्हणजे जनतेला प्राथमिक आरोग्य केंद्रांमार्फत दिल्या जाणाऱ्या सेवा व जनतेचे हक्क याचे अज्ञान. आपणांस या सर्व गोष्टी टाळता येऊ शकतात व जनतेला गुणात्मक व परिणामात्मक आरोग्य सेवा मिळण्याच्या दृष्टीने आपणांस खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. आपल्या अधिनस्त असलेल्या प्रत्येक ग्रामीण रूग्णालय व प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये फलक लावण्यात यावेत. सदर फलकावर खालील माहिती असावी.

अ. ग्रामीण रूग्णालय/प्राथमिक आरोग्य केंद्रामार्फत देण्यात येणाऱ्या विविध आरोग्य सेवा.

ब. विविध आरोग्य सेवा मिळण्याचे वार व वेळ

क. संस्थेमध्ये प्रमुख औषधांचा शिल्लक साठा

ड. रूग्णांनी सेवा मिळण्याकरिता काही शुल्क भरल्यास त्या पैशाची पावती मागण्याबाबतची आग्रहाची सूचना.

ई. रूग्णास तक्रार करावयाची असल्यास ती कोठे व कशी करावी याबाबतचा सूचनाफलक.

२. वरील सर्व मजकुरांचे फलक केंद्रामध्ये मध्यवर्ती ठिकाणी सुयोग्य पध्दतीने लावण्यात यावेत अशा सूचना आपल्या अधिनस्त असणाऱ्या सर्व संस्थांना त्वरित देण्यात याव्यात.

सदर सूचनांचे काटेकोर पालन करण्यात येऊन आपण केलेल्या कार्यवाहीचा अहवाल महासंचालनालयास त्वरित सादर करावा.

शुभेच्छांसह,

आपला स्नेहांकित,

(सुभाष साळुंखे)

प्रति : सर्व जिल्हा शल्य चिकित्सक, सामान्य रूग्णालय

प्रत : जन आरोग्य संसद - २०००, भारत ज्ञान विज्ञान समुदाय, नारायण पेठ, पुणे - ३० यांना माहितीस्तव.

**परिशिष्ट - ३**

# आरोग्य सेवा महासंचालनालय, मुंबई

## महाराष्ट्र शासन

संदर्भ : सआसे/निविमु/आरोग्य संस्था/जनआरोग्य संसद/कक्ष-७ दिनांक : १०/२/२०००

विषय : **आरोग्य कार्यक्रम राबविण्यामध्ये स्वयंसेवी संस्थांचा सहभाग**

संदर्भ : १. जनआरोग्य संसद कार्यकर्ते यांच्यासमवेत दिनांक ८/२/२००१ रोजीची चर्चा

२. सआसे/निविमु/आरोग्य संस्था/सूचना फलक/कक्ष-७,

दिनांक : ७/१२/२०००

प्रिय डॉ.

संदर्भिय क्र. २ च्या पत्रान्वये आपणांस आरोग्य संस्थांमध्ये सूचनाफलक लावण्याबाबत सूचित करण्यात आलेले होते व मला आशा आहे की, आपण या सूचनांचे काटेकोरपणे पालन केलेले असणार. तथापि, अद्यापी या सूचनांचे पालन केलेले नसल्यास,आपणांस पुन्हा एकदा सूचित करण्यात येते की, संदर्भीय सूचनांचे काटेकोरपणे त्वरित पालन करण्यात यावे व केलेल्या कार्यवाहीचा अहवाल महासचांलनालयास सादर करण्यात यावा.

दिनांक ८/२/२००१ रोजी जन आरोग्य संसद कार्यकर्त्यांशी माझी आरोग्याशी निगडीत कार्यक्रम राबविण्यामध्ये स्वयंसेवी संस्थांच्या सहभागाबाबत सखोल चर्चा झाली. आपणांस विदितच आहे की, आरोग्य सेवांचे कार्यक्रम व्यवस्थित राबविण्याकरिता आणि सार्वजनिक आरोग्य व्यवस्था बळकट व लोकाभिमुख होण्याच्या दृष्टीने स्वयंसेवी संस्थांच्या सहभागाला अनन्य साधारण महत्व आहे. या अनुषंगाने आपणांस खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. आपल्या जिल्ह्यातील आरोग्य सेवांशी निगडित नोंदणीकृत स्वयंसेवी संस्था अथवा नोंदणीकृत स्वयंसेवी संस्थांशी संलग्न अशा संस्थांची यादी तयार करावी.

२. नोंदणीकृत संस्थांची यादी तयार केल्यानंतर अशा संस्थांशी संवाद वाढवून त्यांचा आरोग्य सेवेमध्ये कशाप्रकारे सहभाग घेता येईल याचा कृती कार्यक्रम तयार करावा.

३. एखादी स्वयंसेवी संस्था स्वतःहून आरोग्य विषयक कार्यक्रम हाती घेत असल्यास, सदर संस्थेला सर्व ते सहकार्य व आरोग्य विषयक सेवांबाबतची माहिती प्राधान्याने देण्यात यावी.

**आरोग्य विषयक कार्यक्रम क्षेत्रामध्ये व्यवस्थित राबविण्याच्या दृष्टिकोनातून आपणांस खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.**

१. स्त्री आरोग्य कर्मचारी यांच्या गावभेटीचा कार्यक्रम ग्रामपंचायतीमध्ये उपलब्ध असावा, भेटीचा कार्यक्रम स्त्री आरोग्य कर्मचाऱ्यांनी नियमित पाळला जाईल याकडे लक्ष द्यावे.

२. स्त्री आरोग्य कर्मचाऱ्यांनी मुख्यालयाच्या ठिकाणी आठवडयातून किमान एक दिवस रूग्ण चिकित्सा दिवस आयोजित केलेला असावा.

३. एम.सी.पी. सत्रे नियमित होतील याकडे लक्ष द्यावे.

४. स्त्री आरोग्य कर्मचाऱ्यांनी घरभेटीच्या वेळी काही आरोग्य विषयक बाबी आढळून आल्यास उदा. गरोदर स्त्री तपासणी, थंडी तापाच्या रूग्णांचे रक्तनमुने इत्यादी तर अशा बाबती घरभेटीच्या दरम्यानच पार पाडाव्यात.

५. वैद्यकीय अधिकारी यांनी उपकेंद्राला ठरावीक दिवशी व वेळी नियमीत भेटी देऊन रूग्ण तपासावेत व इतर आरोग्य विषयक कामांची तपासणी करावी.

आपणांस सूचित करण्यात येते की, वरील सर्व बाबी वैद्यकीय अधिकारी यांच्या सभेमध्ये निदर्शनास आणून सदर सूचना सर्व क्षेत्रीय कर्मचारी यांच्यापर्यंत पोहचतील व प्रत्यक्ष कृतीत आणल्या जातील याकडे लक्ष पुरवावे. स्वयंसेवी संस्थांचा सहभाग व गावपातळीवर आरोग्य कार्यक्रम राबविण्याच्या दृष्टीने आपण केलेली कृती महासंचालनालयास सादर करावी.

शुभेच्छांसह,
आपला स्नेहांकित
(सुभाष साळुंखे)

प्रति- जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व)
प्रति- जिल्हा शल्य चिकित्सक सामान्य रूग्णालय (सर्व)
प्रत माहितीसाठी : उपसंचालक आरोग्य सेवा परिमंडळे (सर्व)

आपणांस सूचित करण्यात येते की, विभागीय सभेच्या वेळी या सर्व गोष्टींचा आढावा घेण्यात यावा.

प्रत : जन आरोग्य संसद - २००० भारत ज्ञान विज्ञान समुदाय, भगतसिंह सभागृह, २१६, नारायण पेठ , केळकर रोड, पुणे - ३० यांना माहितीस्तव

**परिशिष्ट - ४**

# आरोग्य सेवा संचालनालय
## (महाराष्ट्र राज्य)



| दूरध्वनी क्र. कार्यालयः<br>महासंचालक (वैयक्तिक)<br>सहसंचालक (वैयक्तिक) | २२६२१०३१ - ३६<br>२२६२१००६<br>२२६२०२३५ | शासकीय दंत महाविद्यालय इमारत, ४ था मजला, सेंट जॉर्जेस रुग्णालय इमारत आवार, पी. बी. डिमेलो रोड, मुंबई ४०० ००१<br>पत्र क्र. संअसि/जि पातळीवर स्वयंसेवी संस्थांबरोबर बैठका/कक्ष १५/०५<br>दिनांक - ०४/०२/२००५ |
|---|---|---|



प्रति,

जिल्हा आरोग्य अधिकारी

जिल्हा परिषद ——— (सर्व)

जिल्हा शल्य चिकित्सक

जिल्हा रुग्णालय ——— (सर्व)

**विषयः- जिल्हा पातळीवर स्वयंसेवी संस्थाबरोबर बैठका.**

आपल्या जिल्ह्यामध्ये आरोग्य सेवा पुरविताना खाजगी क्षेत्राचा सहभाग महत्वाचा आहे. निरनिराळ्या जिल्ह्यांमध्ये अनेक स्वयंसेवी संस्था आरोग्य क्षेत्राशी संबंधित कार्य करीत असतात. आरोग्य सेवे विषयी या स्वयंसेवी संस्थांच्या काही विधायक सूचना असतात. याकरिता आपल्या जिल्ह्यामध्ये कार्यरत असणाऱ्या व आरोग्य क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्थांची दर तीन महिन्यांनी नियमित बैठक घेण्यात यावी.

या बैठकीबाबत मार्गदर्शक सूचना पुढील प्रमाणेः

१. आपल्या जिल्ह्यामध्ये आरोग्य क्षेत्रामध्ये काम करत असणाऱ्या स्वयंसेवी संस्थांची दर तीन महिन्यांनी नियमित बैठक घेण्यात यावी.

२. या बैठकीमध्ये आरोग्य सेवा सुधारण्याबाबत स्वयंसेवी संस्थांच्या सूचना, काम करताना आरोग्य विभागाशी संबंधित येणाऱ्या अडचणी याबाबत चर्चा करण्यात यावी.

३. सदर चर्चा ही शासकीय नियमांच्या चौकटीमध्ये करण्यात यावी. त्याचप्रमाणे त्यांनी केलेल्या सूचनांवर करावयाची कार्यवाही ही संचालनालयाच्या तसेच शासनाच्या विविध मार्गदर्शक सूचना, शासन निर्णय यांच्या आधीन राहून करण्यात यावी.

४. याबाबत केलेल्या कार्यवाहीचा अहवाल या कार्यालयास सादर करण्यात यावा.

(डॉ. सुभाष साळुंखे)

**महासंचालक आरोग्य सेवा, मुंबई**

प्रतः - १) अतिरिक्त संचालक आरोग्य सेवा (कुटुंब कल्याण), पुणे.
२) सेहत, ३/४, अमन-इ टेरेस, प्लॉट नं. १४०, डहाणूकर कॉलनी, कोथरुड, पुणे - २९.

**परिशिष्ट - ५**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्र. आरईएस १०,१००१/प्र.क्र. १२०/सेवा १**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दि. ११ डिसेंबर २००१.**

**प्रस्तावना :**

बहुविध आरोग्य सेवा योजनाअंतर्गत कार्यरत असणाऱ्या बहुउद्देशीय आरोग्य कर्मचारी (महिला) या पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या भारत सरकारकडून निश्चित करण्यात आल्या असून राज्य सरकारने त्या स्वीकृत केल्या आहेत.

**शासन निर्णय :**

बहुविध आरोग्य सेवा योजनाअंतर्गत आरोग्य सेवेतील आमूलाग्र बदल लक्षात घेता बहुउद्देशीय आरोग्य कर्मचारी (स्त्री) या पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या या शासन निर्णयाद्वारे निश्चित करण्यात आल्या आहेत.

बहुउद्देशीय आरोग्य कर्मचारी (स्त्री) (सहाय्यक परिचारिका प्रसविका) या पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या या शासननिर्णया सोबत जोडलेल्या सहपत्राप्रमाणे राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(र. ग. पवार)
महाराष्ट्र शासनाचे उपसचिव

**सहपत्र :**

शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. आरईएस १०/१०४९/प्र. क्र. १२०/सेवा १ दि. ११/१२/२००१

**आरोग्य सेविकेच्या जबाबदाऱ्या :**

**अ) प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमः**

१) समाजाच्या गरजांवर आधारित उपकेंद्र कृती आराखडा तयार करणे.

२) गरोदर मातेची नोंदणी करणे व त्यांना प्रसुतीपूर्व दरम्यान व प्रसुती पश्चात सेवा देणे.

३) रक्तक्षयाकरता शारिरीक तपासणी, लघवीतील साखर व प्रथिनांची तपासणी, रक्तातील लोहाचे प्रमाण रक्तदाब घेणे, वजन घेणे आणि पोषण विश्रांती बाबत सल्ला देणे.

४) सर्व गरोदर स्त्रियांची किंवा लैंगिक आजाराची तपासणी होईल ह्याची खात्री करणे.

५) जोखमीच्या, गुंतागुंत असलेल्या गरोदर मातांना वैद्यकीय उपचाराची आवश्यकता असलेल्या आणि प्रजनन विषयक समस्या असलेल्या स्त्रियांना संदर्भ सेवेकरीता पाठविणे.

६) कार्यक्षेत्रात होणाऱ्या एकूण प्रसुतीपैकी ५० टक्के प्रसुती स्वतः करणे.

७) कार्यक्षेत्रातील सर्व प्रसुत्या केवळ प्रशिक्षित व्यक्तींकडून होतील याची खात्री करणे व प्रशिक्षित दाईकडून होणाऱ्या बाळांतपणावर देखरेख करणे व त्यांना मदत करणे.

८) अडचणीचे बाळांतपण व जोखमीचे नवजात अर्भकांना प्राथमिक आरोग्य केंद्रात / प्रथमस्तर संदर्भसेवा केंद्रात पाठविण्यासाठी मदत व पुरवठा करणे.

९) कार्यक्षेत्रात बाळांत झालेल्या प्रत्येक स्त्रीस कमीत कमी तीन भेटी देणे. आवश्यक त्या सेवा व सल्ला देणे. उदा. स्तनपान अर्भकाची काळजी आणि मातेची काळजी.

१०) बालकाची वाढ व विकासाकडे लक्ष देणे आणि आवश्यकता असल्यास संदर्भ सेवा उपलब्ध करणे.

११) मातांना व वयात येणाऱ्या मुलींना व्यक्तीगत किंवा एकत्रितपणे खालील बाबींवर आरोग्य शिक्षण देणे - कौटुंबिक आरोग्य, माता आणि मुलांचे आरोग्य, कुटुंब नियोजन, आहार संसर्गिक आजारावर नियंत्रण, लसीकरण वैयक्तिक व परिसर स्वच्छता इ. जेणेकडून रोगापासून बचाव करण्यासाठी आणि चांगले आरोग्य राखण्यासाठी लोक स्वतः पुढे येतील.

१२) लैंगिक आजार व प्रजनन मार्गाचा जंतु संसर्ग झालेल्या रुग्णांचा शोध घेणे आणि त्यांना आवश्यक त्या सेवा देणे.

१३) उपकेंद्र स्तरावर आरोग्य सेवा क्षेत्रात आरोग्य सहाय्यिका व वैद्यकीय अधिकारी यांना मदत करणे.

१४) प्रत्येक गावात आरोग्य सेवा सत्रांचे आयोजन करुन लाभार्थ्यांना आवश्यक सर्व आरोग्य सेवा पुरविणे.

१५) सर्व गरोदर स्त्रियांना धनुर्वात प्रतिबंधक लसीची आवश्यक मात्रा देणे.

१६) कार्यक्षेत्रात सर्व अर्भक व मुलांचे लसीकरण वेळापत्रकाप्रमाणे योग्य वयात करणे.

१७) लसीकरणासाठी आवश्यक असलेल्या सुया व सिरींज आणि इतर साहित्यांचे व्यवस्थितपणे निर्जंतुकीकरण झाले आहे किंवा नाही याची खात्री करणे व प्रत्येक लाभार्थ्यांना वेगळी सुई व सिरिंज वापरणे.

१८) लसीची तपासणी करणे व दिलेल्या सूचनांचे पालन करणे, लसीकरण वेळापत्रक महत्वाबाबत स्त्रियांना आरोग्य शिक्षण देणे.

१९) शालेय पूर्व मुलांमध्ये आणि अर्भकामध्ये कुपोषणाचे रुग्ण शोधून काढून अशा मुलांना आवश्यक तो उपचार देणे आणि नजीकच्या अंगणवाडी / बालवाडी केंद्रात पूरक आहार देण्याबाबत किंवा आवश्यकता असल्यास वैद्यकीय अधिकारी, प्राथमिक आरोग्य केंद्र यांच्याकडे संदर्भसेवेसाठी रवानगी करणे.

२०) शालेय पूर्व बालके, गरोदर माता, स्तन्दा माता आणि कुटुंब नियोजनाची पध्दत स्विकारणाऱ्यांना

आरोग्य सेविकेशी समन्वय साधून लोहयुक्त गोळ्यांचे वाटप करणे.

२१) तीन वर्षाखालील बालकांना जीवनसत्व 'अ' च्या मात्रा पाजणे.

२२) स्थानिक पातळीवर उपलब्ध असणाऱ्या अन्न पदार्थापासून समतोल आहार तयार करण्याबाबत लोकांना माहिती व आरोग्य शिक्षण देणे.

२३) योग्य जोडपी आणि लहान मुलांच्या नोंदवह्या आधारे कुटुंब कल्याण संबंधित सर्व नोंदवह्या अद्यावत ठेवणे. योग्य जोडप्यांना कुटुंब नियोजनाचा संदेश देणे आणि कुटुंब नियोजनासाठी प्रवृत्त करणे.

२४) पाच योग्य जोडप्यांना पाळणा लांबविण्यासाठी साधने पुरविणे.

२५) कुटुंब कल्याण शस्त्रक्रिया करुन घेण्यासाठी आणि तांबी बसवून घेण्यासाठी आलेल्या लाभार्थ्यांना सुविधा पुरविणे व मदत करणे.

२६) कुटुंब कल्याण शस्त्रक्रिया करुन घेतलेल्या स्त्री लाभार्थ्यांचा पाठपुरावा करणे आणि त्यांच्या समस्या सोडविणे.

२७) समाधानी स्त्री लाभार्थी, स्थानिक नेते, आरोग्य मार्गदर्शक, शिक्षक, स्वयंसेवक आणि इतरांशी चांगले स्नेह संबंध प्रस्थापित करुन कुटुंब कल्याण कार्यक्रमाला चालना देण्याबाबत प्रवृत्त करणे.

२८) निरोध आणि तोंडाने घ्यावयाच्या गर्भनिरोधक गोळ्यांच्या वाटपासाठी डेपो होल्डर्सची निवड करणे, त्यांना प्रशिक्षण देण्यासाठी आरोग्य साहय्यिकेला मदत करणे आणि डेपो होल्डर्सला वरील साधनांचा नियमित पुरवठा करणे.

२९) महिला मंडळाच्या सभेत सहभागी होवून जमलेल्या समुदायाला कुटुंब कल्याण, मुलांचे आरोग्य इ. बाबत माहिती व आरोग्य शिक्षण देणे.

३०) लैंगिक समानतेबाबत समाजाला प्रवृत्त करणे व प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमात पुरुषांचा सहभाग साधण्याबाबत प्रवृत्त करणे.

३१) वैद्यकीय गर्भपात करुन घेणाऱ्या स्त्रियांना जवळच्या सरकारमान्य केंद्रात पाठविण्यासाठी मदत करणे व आरोग्य साहय्यिकेला कळविणे.

३२) वैद्यकीय गर्भपात करुन घेण्यासाठी उपलब्ध असलेल्या सुविधांची माहिती स्त्रीयांना करुन देणे आणि त्याबाबत आरोग्य शिक्षण व संदर्भ सेवा पुरविणे.

३३) सुरक्षित गर्भपात केल्यामुळे होणाऱ्या परिणामाबाबत लोकांना आरोग्य शिक्षण देणे आणि त्यांना असुरक्षित आणि बेकायदेशीर गर्भपात करुन घेण्यासापासून परावृत्त करणे.

**ब) दाई प्रशिक्षण**

१) कार्यक्षेत्रातील सर्व दाईंची यादी तयार करुन त्यांना कुटुंब कल्याण व सुरक्षित प्रसुती बाबत मार्गदर्शन करणे.

२) दाई प्रशिक्षणात आरोग्य सहाय्यिकेला मदत करणे.

**क) साथरोग नियंत्रण:**

गृहभेटी दरम्यान आजाराचे रुग्ण शोधून काढणे उदा. अतिसार, हगवण, पुरळ आलेल्या तापाचे रुग्ण, मेंदुदाह, धनुर्वात, घटसर्प, कावीळ, पोलिओ इ. आणि अचानक साथीच्या आजारांची अपेक्षेपेक्षा जास्त रुग्ण आढळल्यास आरोग्य सहाय्य व वैद्यकीय अधिकारी यांना तातडीने कळविणे.

अतिसाराच्या सर्व रुग्णास क्षारसंजीवनीचे द्रावण वयोगटानुसार देणे, संशयित मोतीबिंदू आणि अंधत्वाच्या सर्व रुग्णाच्या नोंदी घेवून त्यांना पुढील उपचारासाठी पाठविणे.

गृहभेटीच्या वेळी आढळून आलेल्या तापाच्या रुग्णांचा रक्त नमुना घेवून त्यांना गृहीतोपचार देणे आणि पुढील कार्यवाही करण्यास आरोग्य सेवकाला पाठविणे. गृहभेटीच्या वेळी कातडीवर चट्टा आढळल्यास किंवा कातडीच्या रंगामध्ये बदल व त्याठिकाणी संवेदना नसलेले रुग्ण शोधणे व ते आरोग्य सहाय्यकाच्या निदर्शनास आणणे. क्षयरोगाची आणि कुष्ठरोगाची यादी करण्यास आरोग्य सेवकाला मदत करणे. वरील रुग्ण नियमित औषधोपचार घेतात काय यावर लक्ष ठेवणे अनियमित व अर्धवट उपचार घेतलेल्या रुग्णांना व संपूर्ण औषधोपचारासाठी प्रवृत्त करणे आणि असे रुग्ण आरोग्य सहाय्यक यांच्या निदर्शनास आणणे.

**ड) जीवनविषयक आकडेवारीची नोंद:**

१. उपकेंद्रांतर्गत येणाऱ्या सर्व गावात होणाऱ्या जन्ममृत्युची नोंद करणे व तसा अहवाल आरोग्य सहाय्यकांना कळविणे.

२. जन्म व मृत्यूची नोंद वेळीच करण्याचे महत्व लोकांना सांगणे.

३. कार्यक्षेत्रात होणाऱ्या लग्नांची नोंद करणे आणि कायद्यानुसार कमी वय असणाऱ्या मुलामुलींचे लग्न ठरवल्यास किंवा झाल्यास आरोग्य सहाय्यक यांच्या निदर्शनास आणणे.

**इ) प्रथमोपचार व किरकोळ आजार:**

१. प्रथमोपचार साहित्य, क्षारसंजीवनीची पाकीटे व किरकोळ आजारांवरील औषधे योग्य त्या व्यक्तींना / रुग्णांना उपलब्ध करुन देणे.

२. गंभीर आजार व गुंतागुंत झालेल्या, किरकोळ व साध्या आजाराच्या रुग्णांना वैद्यकीय अधिकारी प्रा. आ. केंद्र किंवा जवळच्या दवाखान्यात पाठविणे.

३. आरोग्य मार्गदर्शकाने पाठविलेल्या रुग्णांवर उपचार करणे व आवश्यक वाटल्यास रुग्ण पुढील उपचारासाठी पाठविणे.

**फ) संघकार्य :**

१. प्राथमिक आरोग्य केंद्रात होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या प्रत्येक सभेत हजर राहणे व सहभागी होणे.

२. आपल्या कार्याचे आरोग्य सेविकेशी आणि इतर आरोग्य कर्मचाऱ्याशी समन्वय साधणे.

३. प्रत्येक आठवड्याला एकदा तरी आरोग्य सहाय्यक (पु.) यांना भेट देणे आणि त्यांचा सल्ला व मार्गदर्शन आवश्यकतेप्रमाणे घेणे.

४. कार्यक्षेत्रात घेण्यात येणाऱ्या विविध शिबिरात आणि मोहिमेत सहभागी होणे.

५. स्थानिक स्वयंसेवी संस्था शोधून त्यांना समाजाचे आरोग्य चांगले राखण्यास प्रवृत्त करणे.

**ग) अहवाल व नोंद - वही ठेवणे :**

१. सहा आठवड्यानंतरच्या सर्व गरोदर माता, ०-१२ महिने वयोगटातील सर्व बालके आणि १५ ते ४५ वयोगटातील सर्व स्त्रियांची नोंद करणे व नोंदवही तयार करणे.

२. प्रसुतिपूर्व, प्रसुतिसंबंधित आणि मुलांना देण्यात येणाऱ्या सेवांचे अहवाल तयार करणे.

३. योग्य जोडप्यांची यादी आणि लहान मुलांची यादी तयार करणे व अद्ययावत ठेवण्यासाठी आरोग्य सेवकाला मदत करणे.

४. कुटुंब कल्याण साहित्य वाटप तांबी बसविलेल्या स्त्रियांची नोंद ठेवणे.

५. उपकेंद्र स्तरावर आरोग्य सेवा संघास वाटप केलेल्या स्त्रियांची नोंद ठेवणे.

६. आलेले साहित्य व वाटप केलेल्या साहित्यांची नोंदवही ठेवणे.

७. मासिक प्रगती अहवाल तयार करुन तो वेळीच सहाय्यिकेकडे पाठविणे.

**ह) इतर :**

१. अंगणवाडीला भेट देवून कुपोषित मुलांची यादी करुन मातेला आहाराबाबत आरोग्य शिक्षण देणे.

२. शालेय आरोग्य तपासणीत वै. अ. प्र. आरोग्य सहाय्यक यांना मदत करणे.

३. नवीन कुष्ठरोगी शोध मोहिमेत सहभाग घेणे.

# सलाईन म्हणजे मिठाचे पाणी!

काही आजारांमध्ये पाणी पिता येत नाही किंवा तोंडावाटे पाणी पुरत नाही. अशावेळी थेट रक्तातून पाणी द्यावे लागते. रक्तामध्ये मीठासारखे क्षार असतात. त्यामुळे थेट रक्तातून पाणी देतांना त्यात मीठ वा इतर क्षार घालतात. या निर्जंतुक खारट पाण्याला सलाईन म्हणतात.

*डॉक्टरला सलाईनची बाटली १८ रुपयाला मिळते; डॉक्टर ती लावायला किती पैसे घेतात ?*

## सलाईनची खरी गरज केव्हा असते?

१. पाणी/रक्त शरीराबाहेर वेगाने जात असेल (उदा. अपघातात रक्त जाणे, जोरदार जुलाब-उलट्या)

२. गंभीर आजारामुळे जिवाला धोका/ शस्त्रक्रियेच्या वेळी

३. आजारी माणूस पाणी पिऊ शकत नसेल (उदा. जोरदार उलट्या, बेशुध्दी)

४. शिरेतून सतत औषध द्यायचे असेल (उदा. बाळंतपणात कळा पुरेशा न येणे)

## गरज नसतांना सलाईन घेऊ नका सलाईनने ताकद येत नाही !

**सलाईनने शरीराला ताकद मिळत नाही, फक्त मीठ-पाणी मिळते. आजारी माणूस तोंडावाटे खाऊ-पिऊ शकत असेल तर त्याला सलाईनची सहसा गरज नसते**

जन आरोग्य समिती द्वारा प्रसारित

**विनाकारण सलाईन लावणे बंद झाले पाहिजे!**

प्रकाशक: आरोग्य साथी प्रकल्प, सेहत

# जर गोळी देई आराम
# नको सुईचे जास्त दाम

## साध्या आजारात सहसा सुईची गरज नसते

सुई आणि गोळी यात
औषध एकच असते
फरक एवढाच की
सुई पाच-दहा मिनिटात
काम करु लागते
तर गोळीला
अर्धा तास लागतो.
म्हणून
साध्या आजारात
सुईची गरज नसते.

## डॉक्टरकडे सुई टोचायची मागणी करु नका !

*आरोग्यासाठी पर्याय - आरोग्यासाठी चळवळ !*

**'जन आरोग्य संसद' साठी प्रसारित**

संकल्पना, मांडणी व प्रकाशन - आरोग्य साथी प्रकल्प, सेहत

खासगी डॉक्टरांशी आरोग्य संवादासाठी हे दोन्ही पोस्टर्स तुम्ही साथी कार्यालयातून मागवू शकता.

## 'साथी' ('सेहत' मधून विकसित झालेले 'अनुसंधान ट्रस्ट'चे कृति केंद्र)

आरोग्य व आरोग्य सेवा, विशेषतः प्राथमिक आरोग्य सेवा हा जनतेचा हक्क मानला जावा यासाठी आरोग्य चळवळीत इतर समविचारी संस्था-संघटनांच्या सोबत योगदान देण्याचे काम पुण्यातून 'साथी' करते. साथीचा पाया आरोग्य-साथी प्रकल्पामध्ये (१९९८-२००१) घातला गेला. गेल्या पाच-सहा वर्षात या कामातून खालील प्रकारचे काम झाले आहे -

- दूरवरच्या खेड्यापाड्यांमध्ये साध्या, नेहमीच्या आजारांवर सुरुवातीचा उपचार देण्याची व्यवस्था जनसंघटना किंवा जनवादी संस्थांच्या सोबत उभारायची. त्यासाठी पाड्यातील लोकांनी निवडलेल्या स्त्रियांना आरोग्य साथी म्हणून प्रशिक्षण द्यायचे. आरोग्य साथींनी दिलेल्या या प्राथमिक उपचारांमुळे या दूरवरच्या ग्रामीण, आदिवासी कष्टकऱ्यांचे दरवर्षी लाखों रुपये वाचले आहेत. वेळेवर व पाड्यातच उपचार मिळाल्यामुळे होणारी सोय, टळणाऱ्या गुंतागुंती, लोकांना त्यांच्याच बोली भाषेत मिळणारी माहिती असे फायदेही कमी महत्त्वाचे नाहीत. या पद्धतीने ठाणे जिल्ह्यात डहाणू-जव्हारच्या आदिवासी भागात कष्टकरी संघटना, कोल्हापूर जिल्ह्यात आजरा भागात श्रमिक मुक्ती दल, मध्य प्रदेशात बड़वानी जिल्ह्यात सेंधवा भागात आदिवासी मुक्ती संगठन व पाटी भागात जागृत आदिवासी दलित संगठन यांच्या सोबत १९९८ पासून आरोग्य कार्यक्रम संयुक्तपणे चालू आहेत व त्यातून अशा सहकार्याचा एक नवा पायंडाही पाडला गेला आहे.

- आदिवासी जिल्ह्यांसाठीच्या महाराष्ट्र सरकारच्या नवसंजीवनी योजनेतील काही महिला पाडा-स्वयंसेवकांना डहाणू भागात प्रशिक्षण देण्याच्या प्रयोगातून एका वर्षातच हजारो आजाऱ्यांवर पाड्यातच, वेळेवर मोफत उपचार झाले. (या आरोग्य साथींसाठीच्या 'ग्रामीण आरोग्य कार्यकर्ता प्रशिक्षण' या अभ्यासक्रमाला एस.एन.डी.टी. महिला विद्यापीठ, मुंबईची मान्यता मिळाली आहे.)

- इंजेक्शन, सलाईन यांचा दुरुपयोग, रक्तपांढरी, स्त्रियांचे खास आरोग्य प्रश्न, आपल्या शरीरातील निरनिराळे अवयव; आरोग्य सेवेचा हक्क इत्यादी प्रश्नांबाबत ग्रामीण आरोग्य कार्यकर्त्यांमार्फत आरोग्य-जागृतीचे काम झाले आहे.

- प्राथमिक आरोग्य केंद्रे व ग्रामीण रुग्णालये यांच्यामार्फत मिळणाऱ्या सेवांमध्ये सुधारणा व्हावी यासाठी 'आरोग्य संवाद' असे परस्पर चर्चेच्या कार्यक्रमापासून ते मोर्चा, धरणे असे कार्यक्रम वर नमूद केलेल्या संघटनांनी 'साथी' च्या सहकार्याने घेतले आहेत.

- समविचारी संस्था-संघटनांच्या कार्यकर्त्यांच्या प्रशिक्षणासाठी व त्यांनी घेतलेल्या इतर कार्यक्रमांसाठी दिलेल्या योगदानातून साथीला विश्वासार्हता लाभली आहे.

- 'जन स्वास्थ्य अभियान' हे आरोग्य चळवळीचे व्यापक व्यासपीठ भारतात सन २००० पासून उभे राहिले आहे. सार्वजनिक आरोग्य सेवांमध्ये सुधारणा व काही महत्त्वाच्या आरोग्य-प्रश्नांबाबत जन जागृती यासाठी जन आरोग्य अभियान काम करते. आरोग्य सेवा हा मानवी अधिकार आहे या भूमिकेतून चालवल्या

जाणाऱ्या या अभियानात पुढाकार घेणाऱ्यांपैकी 'साथी' चा संच आहे. सार्वजनिक आरोग्य सेवांच्या खराब स्थितीकडे लक्ष वेधणाऱ्या 'जन सुनवाया' या अभियानामार्फत आयोजित करण्यात आल्या. त्यातही एक आघाडीचा संच म्हणून साथी ने काम केले आहे. जन स्वास्थ्य अभियान च्या राष्ट्रीय संयोजन समितीत 'सेहत' च्या वतीने 'साथी चमू' चा पुढाकार राहिला आहे. मे २००३ पासून जन स्वास्थ्य अभियानच्या राष्ट्रीय सचिवालयाची (National Secretariat) मुख्य जबाबदारी 'साथी' सांभाळत आहे. महाराष्ट्रातील 'जन-आरोग्य अभियान' च्या सहसंयोजनाची जबाबदारीही जानेवारी २००३ पासून 'साथी केंद्र' कडे आहे.

- ग्रामीण आरोग्य सेवांची स्थिती, भूकबळींचा प्रश्न इत्यादी बाबत कृति-संशोधनही निरनिराळ्या संघटना-संस्था सोबत संयुक्तपणे साथी ने वरील कामाला पूरक म्हणून केले आहे.

हे सर्व काम करण्यासाठी मराठी व हिंदीमधे बनवलेले चित्ररूप प्रशिक्षण साहित्य व आरोग्य जागृतीसाठी साहित्य (पुस्तिका, पुस्तके, प्रदर्शने, पोस्टर्स, स्लाईड शो इ.) महाराष्ट्रात व देशात वाखाणले गेले आहे.

या सर्व कामाच्या आधारे साथीने महाराष्ट्रात व देशातही संबंधितांचा विश्वास कमावला आहे.

१९९८ पासून अनुसंधान ट्रस्टच्या 'सेहत' चा भाग म्हणून काम करत असलेल्या साथी चमूचे एप्रिल २००५ पासून 'साथी' या स्वतंत्र संस्थेमध्ये रूपांतर झाले आहे; मुंबईत 'सेहत' हे अनुसंधान ट्रस्ट चे संशोधन केंद्र म्हणून तर पुण्यात 'साथी' हे अनुसंधान ट्रस्टचे कृति-केंद्र म्हणून काम करत आहे.

# आरोग्य जागृतीसाठी 'साथी - सेहत' ची प्रकाशने

| क्र. | प्रकाशनाचे नाव | देणगी मूल्य |
|---|---|---|
| १. | **चित्रमय पोस्टर्स (१८"x २३")** | (संपूर्ण सेट रु. १०) |
| | सलाईन म्हणजे मिठाचे पाणी! (दोन रंगी) | २.५० रु. |
| | जर गोळी देई आराम, नको सुईचे जास्त दाम | १.५० रु. |
| | आपल्या गावात आपल्यासाठी आरोग्य सेवा | १.५० रु. |
| | आरोग्य सेवा-आमचा अधिकार | १.५० रु. |
| | आपल्या आरोग्यासाठी आपण हे करूया! | १.५० रु. |
| | **(वरील पोस्टर्स हिंदीमध्येही उपलब्ध आहेत)** | |
| | तुम्हाला नेहमी थकवा येतो का? (दोन रंगी) | २.५० रु. |
| | (रक्तपांढरी) | |
| २. | **प्रशिक्षण साहित्य** | |
| | आरोग्य साथी- भाग १ व २ | |
| | (तीन रंगी, ८" x १०", प्रत्येकी पृष्ठे ९६, ११६) | प्रत्येकी १२० रु. |
| | **(हिंदीमध्येही उपलब्ध)** | |
| | करू आरोग्याची साथ! - भाग १ व २ (दोन रंगी) | प्रत्येकी १२० रु. |
| | कवाडे उघडू या! (दोन रंगी, पृष्ठे ६८) | २० रु. |
| | आरोग्याची माहिती घेऊ- आरोग्याची चळवळ बांधू! | २० रु. |
| | (दोन रंगी, पाने २४) | |
| ३. | **पुस्तिका** | |
| | जन आरोग्य सनद (पृष्ठे २४) | ८ रु. |
| | जन आरोग्य अभियान (पृष्ठे ३२) | ५ रु. |
| | डॉक्टरांवर नियंत्रण! (पृष्ठे ६४) | १० रु. |
| | करुया आरोग्य संवाद (पृष्ठे ५४) | २० रु. |
| | आपली झाडपाल्याची औषधं (दोन रंगी, पृष्ठे २६) | ४० रु. |
| | महाराष्ट्रातील आरोग्यसेवेच्या हक्कांसाठी पाहणी व जनसुनवाई | १५ रु. |
| | आमच्या शरीरावर आमचा हक्क (पृष्ठे ६४) | २५ रु. |

| क्र. | प्रकाशनाचे नाव | देणगी मूल्य |
| --- | --- | --- |
| ४. | **स्लाईड शो** | |
| | रक्तपांढरी (१८ स्लाईड्स) **(हिंदीमध्येही उपलब्ध)** | ३६० रु. |
| | कथा गर्भपाताची - व्यथा स्त्रीची (५२ स्लाईड्स) | १०५० रु. |
| | आरोग्य सेवा - आमचा अधिकार (१८ स्लाईड्स) | ३६० रु. |
| | **(हिंदीमध्येही उपलब्ध)** | |
| | दारूचे दुष्परिणाम (१८ स्लाईडस्) | ३६० रु. |
| | स्त्री-आरोग्य (७५ स्लाईडस्) | १५०० रु. |
| ५. | **फ्लिप चार्ट** | |
| | रक्तपांढरी (४ रंगी, १८ चित्रांचा सेट) **(हिंदी व मराठी)** | ५० रु. |
| ६. | **झेरॉक्स पोस्टर प्रदर्शने (१८" x २३")** | |
| | दारूचे दुष्परिणाम (१० पोस्टर्स) | ६० रु. |
| | आरोग्य सेवा, आमचा अधिकार (७ पोस्टर्स) | ४२ रु. |
| | आपल्याला कशी आरोग्य सेवा हवी? (७ पोस्टर्स) | ४२ रु. |
| | आरोग्यदायी जीवनासाठी (६ पोस्टर्स) | ३६ रु. |
| | आरोग्याची माहिती घेऊ, आरोग्याची चळवळ बांधू! (२० पोस्टर्स) | १२० रु. |
| ७. | **झेरॉक्स पोस्टर प्रदर्शने (A4 size)** | |
| | रक्तपांढरी (१८ चित्ररूप पोस्टर्सचा सेट व कॉमेंट्री) | २० रु. |
| | दारूचे दुष्परिणाम एक आजार (१० पोस्टर्स) | १० रु. |
| | तंबाखूचे दुष्परिणाम (१० पोस्टर्स) | १० रु. |
| | स्त्री आरोग्य (३६ चित्ररूप पोस्टर्सचा (७२ चित्रे) सेट व कॉमेंट्री) | ४० रु. |
| ८. | **हिंदी प्रकाशन** | |
| | स्वास्थ्य के लिए विकल्प व संघर्ष (पृष्ठ ४४) | १० रु. |
| | आओ मिलकर करे स्वास्थ्य संवाद (पृष्ठ २८) | १० रु. |
| | स्वास्थ्य की समझ बढ़ाएँ, स्वास्थ्य के हक को पाएँ (पृष्ठ १६) | १० रु. |
| | **आगामी** | |
| • | हमारी जड़ी-बूटी की दवाइयाँ (दोन रंगी) (२८ पानी) | ३० रु. |

आरोग्य-सेवेमध्ये सुधारणा करण्यासाठी 'आरोग्य संवाद' ही एक तशी नवीन पध्दत गेल्या काही वर्षांमध्ये आकारली आहे. तिची ओळख करुन देणारी ही पुस्तिका.

आरोग्य समस्यांबद्दलची उदासिनता झटकून नागरिकांनी आपसात तसेच आरोग्य सेवा देणारे डॉक्टर्स, वैद्यकीय कर्मचारी, खासगी डॉक्टर्स, त्यांच्या संघटना यांच्याशी चांगल्या आरोग्य सेवासांठी संघटितपणे संवाद करणे म्हणजे आरोग्य संवाद. या आरोग्य-संवादाबद्दल खालील मुद्यांचे थोडक्यात विवरण या पुस्तिकेत केले आहे-

- गावात, वस्तीमध्ये बैठका घेऊन आरोग्य-संवादासाठी तयारी कशी करायची?
- गाव, उपकेंद्र, प्राथमिक आरोग्य-केंद्र, ग्रामीण रुग्णालय अशा विविध टप्प्यांवर कोणकोणत्या आरोग्य सेवा देण्याचे सरकारचे धोरण आहे?
- या आधारे डॉक्टर्स व इतर आरोग्य-सेवकांशी कसा संवाद करता येईल?
- या आरोग्य संवादाचा पाठपुरावा कसा करावा?
- सरकारी सेवांची स्थिती व लोकांना मिळणाऱ्या सेवांचा दर्जा याबाबत 'जनसुनवाई' हा कार्यक्रम का व कसा आयोजित करायचा?
- खासगी डॉक्टरांशी आरोग्य संवाद कसा, कोणत्या मुद्दयांवर करता येईल?

जन आरोग्य अभियानाला प्रतिसाद म्हणून महाराष्ट्र सरकारने काढलेली दोन परिपत्रके, आरोग्य सेविकेच्या जबाबदाऱ्यांची माहिती देणारे शासकीय परिपत्रक, आरोग्य-संवादासाठी उपयोगी दोन पोस्टर्स असे परिशिष्ट व वरील मुद्यांबाबतचे मार्गदर्शन असलेली ही पुस्तिका महाराष्ट्रातील आरोग्य-कार्यकर्त्यांना, संघटनांना नक्की उपयोगी वाटेल व वापरली जाईल.

*साथी प्रकाशन*

*देणगी मूल्य - रु. २०/-*